# भाग्यनगरीतील हरवलेलं माणिक
# श्री यशवंत सदाशिव कोरेकल


लेखक

प्रा. सुरेश दत्तात्रय कुलकर्णी

मराठी महाविद्यालय, सुलतान बाजार,

हैदराबाद - ५०० ०९५.



प्रकाशक

प. प. श्री लोकनाथ तीर्थ स्वामी महाराज महायोग ट्रस्ट

हैदराबाद (आं. प्र.)

कविवर्य काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद, रहस्यज्ञ

## श्री यशवंत सदाशिव कोरेकल

# एक लहानसे स्वगत

प्रथम श्री सुरेशराव कुलकर्णी यांचे अभिनंदन आणि आभार. माझी प्रवृत्ती थोडी चांगल्या वस्तूंचा संग्रह करण्याची आहे. श्री. यशवंतराव तर माझे मातामह, श्री सद्गुरु मार्तण्डमाणिक प्रभू यांचे आते बंधु, तेव्हा यशवंतरावांचा घनिष्ठ संबंध. त्यांच्या सगळ्या वाङ्मयाचे प्रकाशन मी केले. मी मासिकात किंवा वर्तमान पत्रात कधी काही लिहीत नाही. जेव्हा अगदी लेखणी उचलावीच असा प्रसंग येतो तेव्हा काहीतरी लिहीतो. श्री यशवंतरावांच्या सर्व पुस्तकांचा संग्रह माणिकनगरात मी एका लहानश्या वेगळ्या खोलीत ठेवला होता आणि माझे सर्व आयुष्य प्रवासात गेले. आता तोही तपशील मी टाळतो. माणिकनगर हे लालमातीच्या पर्वतावर असलेले श्री माणिकप्रभूंचे क्षेत्र आहे. त्या पर्वताचे संस्कृत नाव मुनीचुल पर्वत व साधे नाव लालटेकडी. तिथली माती अगदी लाल. लालमातीला वाळवी फार लवकर लागते. तेव्हा असाच मी बाहेर गेलो असताना माणिकनगरला आल्यावर पाहिले तर ती सर्व पुस्तके वाळवीच्या भक्षणात गेली होती. आता यशवंतरावांचे वाङ्मय असे वाचावयास कुठे मिळणार नाही. वाङ्मय वाचावयास न मिळाले तरी वाङ्मयाचे लेखक यांचे चरित्र तरी चाणाक्ष वाचकाना मिळू द्या, असे मी श्री सुरेशराव कुलकर्णी यांना सुचवले आणि जेव्हा सुरेशराव मी आता ते पहातो असे म्हणाले, तेव्हा माझे थोडे समाधान झाले. अशा तऱ्हेने हे लहानसे पुस्तक सध्याच्या म्हणजे यशवंतरावांच्या नंतरच्या दोन पिढ्यानंतर वाचकांसमोर येत आहे. पुढे इतकेच. यशवंतरावांच्या पहिल्या दोन प्रकाशनाच्या प्रस्तावना माझ्या डेक्कन कॉलेजचे मराठी प्रोफेसर श्री. नी. चाफेकर यांच्या कडून लिहून घेतल्या. दुसऱ्या पुस्तकाची प्रस्तावना माझे संस्कृतचे प्रोफेसर

श्री Y. रंगाचार्य यांनी लिहीली. त्यानंतर माझे कॉलेज सुटले तेव्हा प्रस्तावनेकरीता कुणाकडे न जाता त्यांच्या इतर सर्व पुस्तकांना मीच प्रस्थावनेकरीता लेखनी उचलली. माझे लेखन नेहमी अगदी लहान असे हे ह्या पुस्तकांच्या परीक्षणावरून वाचकांस कळेल.

श्री यशवंतराव नंतर आता दोन पिढ्या गेल्या. I am now 90 जेव्हा श्री सुरेशराव म्हणाले की ह्या पुस्तकात तुम्ही कांही लिहाच. तेव्हा मी माझ्या डोक्याला थोडा धक्का दिला.

चाणाक्ष वाचक हे मला विचारतील की तुमचे हे यशवंतराव काय आणि कसे होते ? तर मी इतकेच म्हणेन की, ते अक्षरशः सकलकला कोवीद होते.

१. गायन, पेटी, तबला, सतार, गायनाचे शास्त्रीय ज्ञान पण आवाज चांगला नसल्याने गात नव्हते.

२. त्याकाळात फोटोग्राफी नुकतीच हिन्दुस्थानात आली होती. फोटोग्राफी, ऑईल पेंटींग, सुक्ष्म लेखन, कातर काम वैगेरे.

३. त्याकाळी शाळा-कॉलेज नसल्याने त्यांचे मराठी शिक्षण एका पंतोजींच्या शाळेत आणि उर्दुचे शिक्षण एका मौलवी हजरतकडे झाले. पण पंतोजीच्या शाळेतल्या शिक्षणावर त्यांनी इतके प्रभूत्व मिळविले की, ते या तुमच्या पुस्तकाच्या वाचकांना कळून येईल. मराठी, हिन्दी, उर्दू, फारसी ह्या भाषा त्यांना येत होत्या. इंग्रजी त्या काळी अजुन आली नव्हती. म्हणून ते शिकू शकले नाहीत आणि ह्या तिन्ही भाषावर त्यांनी आप्रतिम लेखन केले. त्या तपशीलात मी इथे जात नाही. एकच विषेश गोष्ट मी सांगतो, त्यांच्या उर्दु गझलांच्या पुस्तकाला त्या काळचे प्रसिद्ध दिवाण His excellency महाराजा किशन प्रसाद बहादूर असे म्हणत असत की, उर्दू मधला लिहीणारा एक हिन्दू ब्राह्मण औरंगजेबाच्या काळात होऊन गेला. त्यानंतर सध्या दुसरे श्री उस्मान अलीच्या काळातले हे यशवंतरावच -

थोडे म्हणता म्हणता मी थोडे अधिकच लिहीले. असो. आता पुन्हा एकदा मी श्री कुलकर्णी यांचे आभार मानून स्वामी श्री विवेकानंदाच्या एक अवतरणाने संपवितो.

" जगातले अत्यंत श्रेष्ठ पुरूष अज्ञात असेच निघून गेले आहेत. त्यांच्याविषयी जगाला काहीच माहिती नाही. अशा या श्रेष्ठ पुरूषांचा विचार केला तर, ज्यांना आम्ही जाणतो ते बुद्ध अथवा क्राइस्ट यांना दुय्यम दर्जाचे वीर पुरूष म्हणावे लागेल. "

'प्रभूदास '
(अप्पासाहेब देशपांडे )

## 'सुमनसौरभ' या काव्यसंग्रहातील श्री अप्पासाहेब देशपांडे यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेतील उतारा

॥ यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं त्वाराधनं ते प्रभो ॥

सरस्वतीमंदिरात श्री शारदेच्या एकनिष्ठ उपासकांनी तिची विविध उपचारांनी पूजा चालविली असताना, दूर उभा राहून दर्शनसुख घेण्याइतकाच ज्याचा अधिकार, त्याला जरा पुढे होऊन श्री शारदेच्या चरणावर चार अक्षता टाकावयास मिळाल्या तर का बरे धन्यता वाटणार नाही ? काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद इत्यादि उपपदांनी विभूषित असलेले श्री यशवंतरावजी यांच्या काव्यक्षेत्रातील विशाल अधिकार आता सर्वमान्य झाला आहे. अल्पावधीतच (१७९ +४२) २२१. पृष्ठांचा प्रथमोद्भव, ''काव्य-कलिका'' (३३६+९७) ४३३ पृष्ठांचा द्वितीयोद्भव ''पुष्प- पाकळ्या'' व ४०० पृष्ठांचा तृतीयोद्भव ''काव्यसौरभ''. एवढा विपुल काव्यसंभार उत्पन्न करून कविवर्यांना महाराजा सर किशन प्रसाद बहादुर यांनी दिलेली '' शाही घोडेस्वारांची उपमा '' (आणि यावर श्री माडखोलकरांकडून मिळालेली दुजोरात्मक अनुमति) त्यांनी अक्षरशः खरी करून दाखविली आहे खरी. अशा अधिकारी पुरूषाने केवळ आपुलकीच्या भावाने स्वतःच्या काव्यासंबंधी चार शब्द लिहिण्यास परवानगी दिली म्हणून प्रथम त्यास अभिवादन करून पुढे वळतो.

'' श्री यशवंतरावांचा जन्म शके १८०८ डिसेम्बर. इ. स. १८८५ साली हैदराबाद शहरी झाला. जन्मानंतर आठ महिन्यानी माता तर १३ व्या महिन्यांत पिता स्वर्गवासी झाले. अशा रीतीने पोरके झाल्यावर यांना आपल्या चुलत भावाच्याच घरी बालपण घालवावे लागले. अशा

परिस्थितीत यशवंतरावांना जे शिक्षण मिळाले ते बेताचेच. बालपणापासून यांना ललितकलेचा विलक्षण नाद असे. कातरकाम, सुक्ष्म लेखन व वाङ्मय इ. ललितकलेच्या विविध शाखेत आज जे विलक्षण प्राविण्य यांनी मिळविले त्याचे श्रेय यांच्या हृदयी असलेला आत्मविश्वास, अपूर्व चिकाटी व अभंग करारीपणा या गुणत्रयीनाच होय व यांनीच यांच्या आयुष्यात पैलू पाडून सर्वांगिण तेजःपुंज केले आहे. यांची बसावयाची जागा सहज भेटीस येणाऱ्या गृहस्थास कलाकौशल्याचे लहानसे प्रदर्शन वाटते.

त्यांच्या उज्वल प्रतिभेचे तेज प्रथम उर्दूतून चमकू लागले. (पुढे) यशवंतरावांचे लक्ष महाराष्ट्र भाषेकडे वेधले. मनात आले की तो विचार कृतीत आणावयाचाच. असा त्यांचा नैसर्गिक स्वभाव असल्यामुळे त्यांनी महाराष्ट्र भाषेवर लौकरच प्रभूत्व मिळविले.

ललित कलेतील हार्मोनियम वादनात त्यानी इतके प्राविण्य संपादन केले आहे की, इ. स. १९१९ साली मुंबईतील गांधर्व महाविद्यालयाच्या वार्षिक उत्सवाचे प्रसंगी विद्यालयाचे संस्थापक व माजी चालक सुप्रसिद्ध विष्णू दिगंबर पलुस्कर यांनी स्वहस्ते त्यांना एक प्रशस्ति पत्र व रौप्यप्याला अर्पण केला होता. ललितकलेचा इतका नाद असूनही रूक्षगणल्या जाणाऱ्या वेदान्त विषयाकडेही यांची बालपणापासून प्रवृत्ति होती. त्याचे मूर्त स्वरूप प्रथम कीर्तने करण्यात व तत्प्रीत्यर्थ प्रासंगिक वेदान्त विषयपूर्ण काव्य रचण्यात प्रगट होऊ लागले. आक्टो. १९२९ पासून आजपर्यंतच्या तत्वज्ञान मंदिरासारख्या उच्च व भारदस्त मासिकात यांचे तत्वज्ञानपूर्ण लेख व कविता सारखे प्रसिद्ध होत आहेत. यावरून यांचा वेदान्त व्यासंग विदित होईल. ही वेदान्तप्रवृत्ति अनुवंशिकही म्हणता येईल. कारण विद्यमान श्री मार्तण्डमाणिकप्रभू, संस्थान

माणिकनगर- यांचे हे आते भाऊ असून, यांचे वडीलही अत्यंत ईश्वरभक्त होते. वेदान्त विषयात संस्कृत भाषेचे ज्ञान अत्यावश्यक असल्याने त्यांनी तारूण्यकालातच रात्रीच्या रात्री जागून काढून वेदान्त संस्कृत ग्रंथाचे परिशीलन केले. याचा परिणाम त्यांच्या काव्यावर तर झालाच, पण रोजच्या आचरणावरही झाल्याशिवाय राहिला नाही. आठ आठ दिवस अन्न न ग्रहण करिता दिवसाचे २४ तास श्रम करण्याची सवयच झाली आहे. काही वर्षे एक दिवस आड तर ४-४ दिवसांनी एकदा - होता होता सध्या तर ४ वर्षापासून आठवड्यात एक दिवस सोमवारी ते भोजन करतात. अव्याहत कार्यमग्न सवयीने गायन वादनाखेरीज इतर बाबतीत उदासीनपणा अंगी बाणल्यामुळे येथे भरलेल्या १६ व्या साहित्यसम्मेंलनापूर्वी यांच्या या गुणसमुच्चयाची माहिती येथल्या परिचित ग्रहस्थानांसुद्धा नव्हती.

गायन - वादन विषयाकडे प्रवचनोत्तर श्री प्रभूभजनानिमित्त तास दोन तास त्यांचे खर्च होतात. यांना एक मुलगी व एक मुलगा अशी दोन अपत्ये झाली. यांचा मुलगा आपल्या वयाच्या १८ व्या वर्षा वारला. तोच शके १८४८ मध्ये यांना आपल्या पत्नीचाही चिरवियोग झाला. यांनी पुनः लग्न केले नाही. पण हे कधीच दुःखी आढळत नाहीत किंबहुना जेव्हा पहावे तेव्हा हसतमुखाने स्वागत करण्याची यांची वागणूक असते. हा एक वेदान्तप्रवृत्तीचा विजय मानावयास काय हरकत आहे ?

काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद यशवंतरावजी कोरेकल यांची शारदोपासना इतकी विविध, विपूल व गुणप्रसू आहे की तिचा ओझरता उल्लेख करण्यास त्यांच्या एवढीच ग्रंथसंपत्ति निर्माण करणे आवश्यक आहे. ठराविक गेयगीतकांतून प्रणयनिराशेच्या भावना व्यक्त करणे आणि काव्यकौस्तुभासारखे वेदान्त प्रमेयप्रचुर, सरस व प्रासादिक

काव्य निर्माण करणे यामध्ये केवढे महदंतर आहे याची केवळ कल्पनाच करणे बरे. काव्यकौस्तुभांना ''वृत्तसम्राट'' ही जी पदवी जनता जनार्दनाने अत्यादरपूर्वक व स्वयंस्फूर्तीने अर्पण केली, ती किती यथार्थ क्षर आहे याची कल्पना ' पुष्पपाकळ्या' तील केवळ वृत्तांची यादी वाचल्यानेच होण्यासारखी आहे. वैदिक व संस्कृत छंदशास्त्रावरील अनेक ग्रंथाचे सूक्ष्म अवलोकन करून त्यांनी मराठी वाङ्मयात नवीन वृत्तांची जी भर गातली आहे. त्या बद्दल गराठी वाङ्मयाच वृत्त साम्राटांचे शाश्वतचे ऋणी रहावे लागेल. काव्य प्रमाणेच काव्यकौस्तुभाचे गद्यही अत्यंत अभिजात व विद्वत्वपूर्ण आहे काव्यकौस्तुभ हे हिन्दी, उर्दू व मराठी भाषेतील उत्तम व्यक्ते आहेत. सूक्ष्म व गुंतागुंतीच्या अनेक धार्मिक प्रश्नांबद्दल त्यांनी परिश्रमपूर्वक मनन केले असल्यामुळे धार्मिकवाद विवाद सभांतून त्यांना अध्यक्षपद देण्यात येते. पुणे व नाशिक या ठिकाणच्या वसंत व्याख्यानमालेत त्यांनी अध्यात्मिक विषयावर पुष्पे गुंफिली आहेत. त्यांच्या निवासस्थानी ''प्रभूदरबारात'' प्रतिदिवशी सायंकाळी नियमितपणे उपनिषद्, शारीरभाष्य, अमृतानुभव आदि वेदान्त ग्रंथावर काव्यकौस्तुभांची प्रवचने होतात.

# प्रकाशकाचे दोन शब्द

'श्री'

यद्यदाचरति श्रेष्ठ स्तत्तदेवेतरे जनाः ।

स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनु वर्तते ॥

या पवित्र भारत भूमीत अनेक संत, महात्मे, महापुरुष होऊन गेले, आणि त्यानी आपल्या आचरणावरून इतरास आदर्श जीवन पद्धती कशी असावी, हे दाखवून दिले. याच थोर पुरुषांच्या रत्न मालिकेतील एक रत्न श्री यशवंतराव सदाशिव कोरेकल हे होत. बालपण अत्यंत कष्टात घालवून, आपल्या जीननात नाना प्रकारे संघर्ष सहन करून त्यातूनही आपले जीवन उज्वल, प्रकाशमय व इतरासाठी बोधप्रद आदर्श जीवन निर्माण केले.

" यथा चतुर्भिः कनकं परीक्ष्यते

विघर्षणच्छेदनताप ताडनैः ॥

तथा चतुर्भिः पुरुषं परिक्ष्यते ।

श्रुतेन शीलेन गुणेन कर्गणा ॥

श्री कोरेकलांचे श्रेष्ठत्व श्रुतेन, शीलेन, गुणेन व कर्मणा या चार ही प्रकारांनी सिद्ध होते. स्वतः उत्तग संत कवी असूनही काव्याचे श्रेय ते आपणाकडे न घेता सद्गुरुकडे देतात. (सद्गुरु-कृपा) हीच ईश्वरी कृपा होय. या कृपेनेच वाग्देवता शारदा प्रसन्न होते. तिच्या प्रसादाने प्रतिभेची प्राप्ती होते व प्रतिभेच्या बळावर काव्य होते. अशी काव्यकारण परम्परा त्यांना मान्य होती. केवळ काव्य क्षेत्रातच नव्हे तर प्रत्येक गोष्ट, सद्गुरुंच्याच कृपेने होते, सद्गुरुशिवाय अन्य कोणीच काही करत नाही असे ते म्हणतात.

गुरुविण जगि नाही कोणिही तारणारा
त्रिभुवनि नच दीना कारणे धावणारा।

दुस्तर अशा भवसागरात केवळ सद्गुरुच तारक होतात त्याशिवाय अन्य तरणोपाय नाही. शिष्याच्या अंत:करणात ईश्वर भक्तीचे बीज पेरून अंकुरित करावयाचे व स्वानुभूति रूपी श्रद्धेचे जलसिंचन करून शिष्याला सच्चिदानन्दापर्यंन्त पोहोचविण्याचे कार्य सद्गुरूच करत असतात.

या शिवाय श्री यशवंतराव कोरेकल हे उत्तम भक्त, आचारसम्पन्न, व तत्वनिष्ठ होते. आचारसंपन्नतेचे उदाहरण म्हणजे ते कोठेच अन्न घेत नव्हते. रोजची पार्थिव पूजा कधी चुकली नाही ही धर्मनिष्ठा. या व्यतिरिक्त गायन, वाद्य, संगीत, चित्रकला, फ़ोटोग्राफी इत्यादि अनेक कलांचा संगम त्यांच्या अंगी होता, आणि या कलांचा अभ्यास मात्र कोठेही न करता स्वयंशिक्षक होउन व श्री दत्तात्रेयांचे चतुर्थावतार सद्गुरु श्री मार्तंड माणिक प्रभूंच्या कृपेने प्राप्त केला होता. स्वत: श्री मार्तण्ड माणिक प्रभूंनी त्यांना महादेवबाण, सोवळे(पितांबर) व प्रभूंच्या सुवर्ण प्रतिकांची टोपी देऊन त्यांचा गौरव केला होता, काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, राकलकला कोविद, रहस्यज्ञ अशा अनेक पदव्यांनी विभूषित श्री कोरेकल यांचे चरित्र आधुनिक पिढीस माहित नाही. हे चरित्र प्रा. सुरेश दत्तात्रेयराव कुलकर्णी यांनी आज आपणास उपलब्ध करून दिले आहे. या लिखाणासाठी त्यांना खूपच परिश्रम करावे लागले; हे मला माहित आहे, तरी त्यांनी त्या परिश्रमाची तमा न बाळगता, या महापुरुषाचे चरित्र पूर्ण केले. भाषा ओघवती, सर्वांना समजेल अशी असून प्रत्येक घटनांचा उल्लेख हा सप्रमाण

आहे. प्रा. सुरेश कुलकर्णी यांचे हे कार्य स्तुत्य असून, नवीन पिढीतील युवकांना मार्गदर्शक व प्रबोधक ठरणार आहे.

असेच लिखाणकार्य प्रा. सुरेश कुलकर्णी यांचे कडून व्हावे व जनप्रबोधनास उपयुक्त ठरावे. या ग्रंथास सद्गुरुस्मरण पूर्वक शुभाशिर्वाद आहेत.

आश्विन शु.६ शके १९२१
शुक्रवार दि.१५-१०-१९९९

**हरिभाऊ जोशी निदूरकर**
अध्यक्ष
**प. प. श्री लोकनाथ तीर्थ**
**स्वामी महाराज महायोग ट्रस्ट**
२-१७-११९, एस. बी. एच. कॉलोनी,
उप्पल, हैदराबाद ५०० ०३९.

# खुशनसीब नसलेले खुशनवीस

माझे पितृतुल्य स्नेही कीर्तिशेष व्यंकट भाऊराव ऊर्फ तात्यासाहेब धनाश्री, सेवानिवृत्त उपमहालेखापाल, हैदराबाद राज्य, यांच्या पंधरा वर्षांच्या नित्य सहवासात आठवड्यातून दोन-तीन वेळा तरी 'यशवंत सदाशिव कोरेकल' या विषयावर बोलणे निघत असे. नारायणराव पंत, इस्तारी, न्यालकल इत्यादि कोरेकल शिष्य कधी कधी भेटले म्हणजे आपल्या गुरुविषयी भरभरुन बोलत असत. मधेच एकदा एका बहुश्रुत वृद्ध गृहस्थाने माहिती दिली, पुण्याच्या प्रतिष्ठित 'वसंत व्याख्यानमालेत' हैदराबादच्या ज्या तीन चार विद्वानांना व्याख्यानाचे प्रतिवर्षी निमंत्रण येत असे, त्यात यशवंतराव कोरेकलांचा हमखास समावेश असायचा. त्यांच्या व्याख्यानाने प्रभावित झालेल्या श्रोत्यांना श्री कोरेकल तत्वज्ञानाचे किंवा साहित्याचे प्राध्यापक नसून एका सरकारी कार्यालयात साधे कारकून आहेत हे कळल्यानंतर त्यांच्या आश्चर्याला पारावार रहात नसे. संगीतातील जुन्या जाणत्या मंडळीकडून कोरेकलांच्या पेटीवादनातील कौशल्याची प्रशंसा नेहमीच ऐकायला मिळत असे. कोरेकलांचा एका कवितासंग्रहाचा अभ्यास महाविद्यालयात असतांना करावा लागल्याचे कांही ज्येष्ठ मित्रांनी सांगितले होतेच. एकदा अंमळनेरच्या 'तत्वज्ञान'मासिकाचे जुने अंक चाळीत असताना 'डॉ. वा. दा. गाडगीळ', 'श्री. म. दा. गाडगीळ' आणि ' श्री यशवंत सदाशिव कोरेकल' अशी तीन हैदराबादवासियांची नांवे दिसल्यामुळे कुतुहलाने काही लेख वाचल्यानंतर कोरेकलांचा वेदांताविषयातील अधिकार लक्ष्यात आला. भारतगुणवर्धक संस्थेच्या संग्रही असलेले त्यांचे कातरकाम, सुलेखन आणि सूक्ष्माक्षरचित्र (साध्या डोळ्यांना दिसणारी चित्ररेषा सूक्ष्मदर्शक भिंगाखाली बघितल्यास 'माणिक'

या सुस्पष्ट अक्षरांची पंक्ति दिसून येते) यांचे नमुने बघून थक्कच झालो आणि योगी (कोरेकल आठवड्यातून केवळ सोमवारी एकदा जेवत आणि इतर दिवशी फक्त चहावरच रहात असत) अशा अनेक पैलू असलेल्या या चतुरस्र व्यक्तिमत्वाविषयी मनात कुतूहल निर्माण झाले होते. तशातच एके दिवशी तात्यासाहेबांनी कोरेकलांच्या सर्व ग्रंथांची एकेक प्रत माझ्या स्वाधीन केली आणि म्हणाले 'यशवंतराव आमच्या कचेरीत 'खुशनवीस' (सुलेखक) या पदावर काम करीत होते. पण आम्ही त्यांना म्हणत असू 'यशवंतराव तुम्ही 'खुशनवीस' आहात परंतु 'खुशनसीब' (सुदैवी) मात्र नाहीत. आमचे हे म्हणणे त्यांच्या व्यक्तिगत जीवनाविषयी होते. पण दुर्दैवाने आज त्यांच्या साहित्याबद्दलही खरे ठरत आहे. आतापर्यंत मी चार-पाच प्राध्यापकांना त्यांचे साहित्य देऊन अभ्यास करावयास सांगितले. पण व्यर्थ. आता तुम्ही तरी कांही करा. तेव्हापासून हा विषय माझ्या डोक्यात होता.

कोरेकलांचे साहित्य मी वाचून काढले, परंतु तात्यासाहेबांची अपेक्षा मात्र पूर्ण करणे मला जमले नाही. माझे बंधु प्रा. सुरेश कुलकर्णी यांनी जेव्हा एम. फिल्. च्या अभ्यासाला प्रारंभ केला, तेव्हा मी त्यांना हा विषय सुचवला. त्यांचे मार्गदर्शक व माझे मित्र कै. डॉ. व. दा. कुलकर्णी यांनाही हाच विषय कसा योग्य आहे हे पटवून दिले. परिणामी सुरेश कुलकर्णी यांनी अपार कष्टाने प्रबंध सिद्ध केला आणि पदवी मिळविली.

प्रा. सुरेश कुलकर्णी यांनी इतके कष्ट घेऊन केलेला यशवंतरावांचा अभ्यास विद्यापीठाच्या परीक्षा विभागात बंदिस्त व्हावा हे श्री. प्रभुदास, अप्पासाहेब देशपांडे, माजी व्यवस्थापक माणिकप्रभु संस्थान आणि यशवंतरावांच्या ग्रंथांचे प्रकाशक यांना पटले नाही आणि म्हणूनच

आयुष्याच्या शतकाच्या उंबरठ्यावर असून देखील, हा अभ्यास ग्रंथरूपाने मराठी विश्वासमोर यावा यासाठी त्यांनी तनमनधनाने, कुलकर्णी यांच्यामागे लकडा लावला म्हणूनच आज, पाच तपानंतर यशवंत सदाशिव कोरेकल यांच्यावरील ग्रंथ पू. अप्पासाहेब देशपांडे यांच्या समोर याचि देही याचि डोळा प्रकाशात येत आहे, हे देखील 'खुशनशीब'च म्हणावयाचे.

- रामाचार्य घनपाठी

# शोधास निघण्यापूर्वी

आम्हा भारतीयांना, त्यातही आम्हा मराठी लोकांना आमच्या उज्वल इतिहासाचा फार अभिमान. पण हा इतिहास समजून घेण्यासाठी लागणारी साधने मात्र आमच्या अक्षम्य दुर्लक्षाचा विषय झालेला, अशी परिस्थिती आहे. कोणत्याही राष्ट्रात वा समाजात आपला गतेतिहास, संस्कृती, साहित्य, कला आदी गोष्टींची नुसती जाणीव असून भागत नाही, तर ही जाणीव पुढील पिढ्यांमध्ये संक्रमित करण्यासाठी त्यांचे संरक्षण व संवर्धनही करणे आवश्यक असते. त्यासाठी त्यांच्या अभ्यासाची साधने निर्माण करणे, अशा साधनांचे संवर्धन करणे व त्यांच्या सहायाने त्यांचे पुनरावलोकन करीत राहणे आवश्यक असते. अभिनिवेश निरपेक्ष रीतिने अशा साधनांची नोंद ठेवणे, त्यांचा उपयोग करून निखळ इतिहास लिहून काढणे ही कोणत्याही राष्ट्राची व समाजाची, त्याच्या निकोप आणि विकासोन्मुख वाढीसाठी एक अत्यावश्यक गरज असते.

निखळ ऐतिहासिक दृष्टी ठेवून आणि अभिनिदेश विरहित उद्दिष्ट ठेवून लिहिलेली लहान-थोर व्यक्तींची चरित्रे ही अशाच ऐतिहासिक साधनांपैकी एक होत. समाज इतिहास घडवीत असतो आणि व्यक्ती समाज घडवीत असते. कोणत्याही समाजाच्या घडणीतील एक चिरा बनण्याचे कर्तृत्व अंगी असलेल्या आणि त्या कर्तृत्वाने काही एक ठसा इतिहासावर उठविण्याचे भाग्य लाभलेल्या व्यक्तींची चरित्रे लिहिली जाणे म्हणूनच अत्यावश्यक असते. इतिहासाच्या घडणीच्या, समाजाच्या उभारणीच्या या व्यक्ती शिल्पकार असतात. अशा शिल्पकाराचे केवळ एकदाच नव्हे तर वारंवार पुण्यस्मरण करणे समाजाला एक विकासोन्मुख दिशा देण्यासाठी, गत उज्वल इतिहासापासून प्रेरणा घेऊन आगतशील भविष्यकाळ उजाळून टाकण्यासाठी अत्यंत उपयुक्त ठरत असते.

त्या दृष्टीने प्रा. सुरेश कुलकर्णी यांनी रचलेला हा चरित्रग्रंथ बघावयास हवा.

श्री यशवंत सदाशिव कोरेकल हे एकोणवीस-विसाव्या शतकाचा जो संमिश्र संधिकाळ या देशात होऊन गेला, त्या काळातील व्यक्तीमत्व आहे. प्राचीन परंपरांच्या ठाणदिवीने उजळलेल्या पौर्वात्य रस्त्यावरून चालतानाच पाश्चिमेकडून आलेल्या नवयुगाच्या दिपवून टाकणाऱ्या लखलखाटाने ज्यांच्या जीवनात एक प्रचंड उलथापालथ घडवून आणायला सुरुवात केली होती, अशा पिढीचे कोरेकल हे एक नमुनेदार प्रतिनिधी होते. जुन्यातले चांगले वेचून पदरात सांभाळून ठेवायचे आणि नव्यातले ईष्ट ते नीट पारखून घेऊन अंगीकृत करावयाचे यासाठी आवश्यक असणारा भावनांचा समतोलपणा आणि बुद्धीची विवेकनिष्ठता यांचा सुंदर संगम आपणाला कोरेकल यांच्या व्यक्तिमत्वात पहावयास सापडतो.

''दारिद्र्यातच जगणे-मरणे

परि सत्वा नच विस्मरणे ।''

हे त्या समयीच्या मध्यमवर्गीय कुटुंबाचे सार्वत्रिक वर्णन होते व त्यानुसारच कोरेकलांचे जीवन गेले. पण परिस्थितीने व नियतीने दिलेले हे जीवन ऐहिक समृद्धी नसली तरी आपण किती आत्मिक समृद्धीने जगू शकतो हे पहावयाचे असेल तर कोरेकलांच्या जीवनाकडे दृष्टीक्षेप टाकावयास हवा.

महाराष्ट्र सारस्वताच्या दरबारात भलेही ते पहिल्या रांकेचे मनसबदार नसू देत, पण आपली सेवा त्यांनी या दरबारात ज्या उत्कटतेने सादर केली, ती उत्कटता मला महत्वाची वाटते. आपला काव्यसंग्रह विद्यार्थ्यांना अभ्यासासाठी नेमण्यात आला आहे हे समजल्यानंतर,

त्यांच्यासमोर तो अशुद्ध स्वरूपात जाऊ नये म्हणून प्रत्येक प्रतीच्या प्रत्येक पानावरील प्रत्येक अशुद्ध शुद्ध करण्यासाठी त्यांनी केलेला प्रचंड खटाटोप पाहिला म्हणजे स्वतःच्या कार्यावर त्यांची केवढी जाज्वल्य निष्ठा होती आणि सारस्वत मंदिराचे पावित्र्य जपण्यासाठी त्यांची केवढेही श्रम करण्याची कशी तयारी होती, त्याचे दर्शन आपणास घडते. आजच्या विद्युतकीच्या युगात शुद्धाशुद्धीचे कार्य चुटकीसरसे होण्यातले असले तरी अशा निष्ठेवाचून आपल्या भाषेचे कसे धिंडवडे निघत आहेत, ते आपण पदोपदी पाहातच आहोत. या पार्श्वभूमीवर कोरेकलांसारख्यांचे चरित्र नव्या पिढीसमोर येणे, त्यांचे उदाहरण आजच्या बेफिकीर बनत चाललेल्या पिढीला देणे किती आवश्यक आहे त्याची खात्री पटते.

कोरेकलांच्या भाषाशुद्धिविषयक कामगिरीबरोबरच त्यांची वृत्त व छंदविषयक कामगिरीही अशीच महत्वाची आहे. आपली वृत्ते, आपले छंद हा एक अभिमान बाळगावा असा आपला ठेवा आहे. त्यामागे नुसते अत्यंत गहन असे तत्वज्ञानच नाही तर, मानवी भावभावना जाणून घेण्यासाठी आवश्यक त्या मानसशास्त्रीय कसोट्याही आहेत. मुक्तछंदाच्या नावाखाली लयतालाचे प्राथमिक नियमदेखील डावलून केल्या जाणाऱ्या आजच्या अनेक रचना पाहिल्या म्हणजे, मानवी जीवनाच्या गतिमानतेला लयतालांच्या सुरेख आवर्तनात बद्ध करून त्यातून कर्णामृत साक्षात करणारे अक्षय्य संगीत निर्माण करणारी छंदोरचना कशी महत्वाची आहे, ते आपल्या लक्षात येईल. कोरेकलांनी उपयोजित केलेल्या असंख्य छंदांचा अधिक अभ्यास करण्याची प्रेरणा आधुनिक पंडितांना झाली तर या चरित्राचे एक कार्य सिद्ध झाल्यासारखे होईल.

तत्वज्ञान, अध्यात्मविचार हा तर आमचा खास प्रांत. अर्थात त्यात अनुभूतीचे बोल बोलणारे किती आणि तिचा देखावा करणारे किती

हा मुद्दा अलाहिदा. पण कोरेकलांनी ज्या तळमळीने आपल्या प्राचीन तत्वज्ञानाचा धांडोळा घेतला आणि ते सकलमत संप्रदायाच्या माध्यमातून आपणासमोर मांडले ते पूर्ण श्रद्धेतूनच. त्यांची आपल्या तत्वपरंपरांवरील, आपल्या गुरुवरील निष्ठा जाज्वल्य आहे हे त्यांच्या शब्दाशब्दातून जाणवते.

कोरेकलांना अनेक हस्तकौशल्ये अवगत होती. ते अनेक भांषामध्ये पारंगत होते. लेखन-वाचन -प्रवचन हा तर त्यांच्या जीवनाचा स्थायिभावच होता. आपल्या काळातील ते एक समाजमान्य व्यक्तित्व होते.

दुर्दैवाने मधल्या काळात समाज या विलक्षण व्यक्तिमत्वाला विसरून गेला होता. भाग्यनगरचे हे माणिक विस्मरणाच्या गर्तेत बुडून गेले होते. प्रा. सुरेश कुलकर्णी यांनी कष्टपूर्वक ते शोधून पुन्हा समाजासमोर सादर केले आहे. त्याचा योग्य तो सन्मान आपले इतिहासकार, वाङ्मयप्रेमी आणि सुजाण समाज करील अशी मी आशा करतो आणि प्रा. सुरेश कुलकर्णी यांनी हे अवघड कार्य चांगल्या रीतीने पूर्णत्वास नेले याबद्दल त्यांचे अभिनंदन करतो.

**- पद्माकर दादेगावकर**

प्रोफेसर,

हैदराबाद विद्यापीठ,

हैदराबाद- ५०००४६.

# ऋण निर्देश

**॥श्री गुरुदेव दत्त॥ ॥ श्री माणिकप्रभू महाराज प्रसन्न ॥**

सद्गुरु श्री दत्तमहाराज कवीश्वर यांचे ऋण मान्य केल्याशिवाय माझे कोणतेच कार्य होत नाही. कारण ते आम्हा सर्वांचेच परमार्थ मार्गातील गुरु आहेत.

सद्गुरु प्रभूदास श्री अप्पासाहेब देशपांडे यांचे ऋण फार मोठे आहे किंबहुना त्यांच्या कृपाशिर्वादानेच हे कार्य झालेले आहे. मी केवळ निमित्तमात्र आहे. कोरेकल या विषयावरती प्रबंध लिहिताना त्यांनी वोळोवेळी मुलाखती दिल्या. स्वतःजवळचे ग्रंथ दिले. नंतर आता वयाच्या ९३ व्या वर्षी प्रबंध वाचून कोरेकलांना पुस्तकरूपाने आणण्याची प्रेरणा दिली. त्यासाठी तन मन तर लावलेच पण फार मोठे धन देऊन आर्थिक साह्य केले. केवळ त्यांच्या मुळेच हे पुस्तक आज वाचकांच्या समोर येऊ शकले. त्यांचा मी ऋणी आहे. प. पू. श्री नारायण काका ढेकणे महाराज यांनी या पुस्तकाची संहिता पाहून आशिर्वाद दिले.

प. प. सद्गुरु श्री हरिभाऊ निटूरकर यांनी या पुस्तकांसाठी आशिर्वाद दिले व प. प. लोकनाथ तीर्थ स्वामी महाराज महायोग ट्रस्ट या त्यांच्या संस्थेतर्फे 'प्रकाशक' म्हणून जबाबदारी स्वीकारली म्हणून त्यांचा मी ऋणी आहे.

दुसरा ऋण निर्देश करावयाचा तो डॉ. पद्माकर दादेगावकर व डॉ. सौ उमा दादेगावकर यांचा. कोरेकलांवरती प्रबंध लिहित असताना त्यांचे संपूर्णपणे मार्गदर्शन लाभले. कोरेकलांच्या अत्यंत बारीक अक्षरात

असलेल्या दैनंदिन्या व त्यांच्या संपूर्ण ग्रंथांचे परिशिलन करून प्रबंधिकेची मांडणी करण्यात त्यांनी सतत मदत केली. तसेच आताही यशवंतरावांना पुस्तकरूपाने सामोरे आणण्यात या दांपत्याने सतत परिश्रम घेतले. प्रुफ तपासण्याचे कामही अहोरात्र केले आणि विनंती करताच या पुस्तकाला त्यांनी सुंदर प्रस्तावना लिहून दिली. त्यांच्या या मदतीमुळेच हे काम पूर्ण होऊ शकले. त्यांचे ऋण फार मोठे आहे. त्यांच्या ऋणातच राहाणे मला आवडेल.

त्यानंतरचे ऋण म्हणजे माझे बंधु श्री रामाचार्य घनपाठी व सौ. अबूंजा घनपाठी यांचे. यांनीच मला भाग्यनगरीची ओळख करून दिली. भाग्यनगरीत पाय ठेवायला जागा देऊन माझे भाग्य उजळवले. त्यांच्या मुळेच मी व माझे कुटुंबीय एक स्थिर जीवन जगत आहोत. हे दोघेही सतत माझ्या पाठीशी उभे आहेत. 'यशवंतराव कोरेकल' हे नावही प्रथम त्यांनीच सुचवले व त्यांच्यावरच प्रबंध लिहिण्याचा सल्ला दिला. स्वत:बरोबर येऊन साहित्य मिळवून दिले, अनेकांच्या ओळखी करून दिल्या. त्यांच्यामुळेच मी हा विषय घेऊ शकलो. या पुस्तकासाठी लेखी आशिर्वाद दिले. तन मन धनाने ते सतत माझ्या पाठीशी उभे आहेत.

त्यानंतरचे ऋण म्हणजे प्रा. श्री द. पं. जोशी व डॉ. सौ. उषाताई जोशी यांचे. त्यांनीच मला अभ्यास करत राहाण्याची दृष्टी दिली. मार्गदर्शन केले व प्रत्येक प्रसंगी सतत भक्कम ढाल बनून पाठीशी उभे आहेत. माझ्या आतापर्यंतच्या प्रगतीत त्यांचे बहुमोल साहाय्य आहे. त्यांचे ऋण मोठे आहे.

श्री प्रमोद वाकनीस व सौ. सुनंदा वाकनीस यांचे ऋण मोठे आहे. श्री वाकनीस म्हणजे 'कल्पवृक्ष'. माझे भाग्य मोठे की मला सतत या कल्पवृक्षाच्या सावलीत रहावयाला मिळत आहे. या छायेत राहाणाऱ्या माणसाला काय कमी? श्री अप्पासाहेब महाराजांनी हे पुस्तक लिहून

घेण्याची जबाबदारी श्री वाकनीसावरती सोपवली व वाकनीसांनी ते माझ्याकडून करवून घेतले. मी केवळ लेखनवीस आहे, बाकी सर्व श्रेय माझे नाही.

मी फक्त लिहित गेलो, या लिखाणाला अत्यंत सुंदर रूप देऊन त्याची सुबक छपाई करण्याचे काम आमचे परममित्र श्री बळवंतराव कौशिक (श्री संतोष प्रिंटिंग प्रेस) यांनी अत्यंत कमी वेळात व अत्यंत कमी मोबदल्यात केले. त्यांच्या सहकार्यामुळेच हा ग्रंथ साकार होऊ शकला. मी त्यांचा ऋणी आहे.

त्यानंतरचे सर्वप्रथम ऋण म्हणजे ज्यांनी मला या जगात आणले ते माझे पिताश्री श्री दत्तात्रयराव कुलकर्णी व मातोश्री सौ. गोदावरीबाई कुलकर्णी. माझे वडिल हेच माझे पहिले विद्या गुरु. त्यांच्या आशिर्वादानेच हे कार्य पूर्ण करू शकलो. शिक्षणाच्या कालावधीत मला सतत प्रोत्साहन देत व आर्थिक भाग सतत आपल्या खांद्यावर घेवून मला शिक्षणास मदत करणारे माझे ज्येष्ठ बंधू श्री विश्वासराव कुलकर्णी व सौ. विजया कुलकर्णी. माझ्या प्रपंचाचा संपूर्ण भार उचलणारी व माझ्या संपूर्ण कुटंबाला अध्यात्ममार्गाच्या वाटेवर घेऊन जाणारी, माझी धर्मपत्नी सौ. ललिता कुलकर्णी या सार्वांचे ऋण घेऊनच हा प्रवास करीत आहे.

- लेखक

# आभार

यशवंत सदाशिव कोरेकल यांना पुस्तकरूपाने वाचकांच्या समोर आणण्यात मला आनंद होत आहे. या कार्यासाठी अनेकांचे असंख्य हात लागले. प्रत्येकाने आपापल्यापरीने आपला वाटा उचलला त्यामुळे खरे म्हणजे माझ्याच वाट्याला काही राहीले नाही. मी केवळ निमित्त मात्र आहे. सर्वच जवळचे.कोणाचे आभार कसे मानू. हाच माझ्या समोर मोठा प्रश्न आहे केवळ उपचार म्हणून मी माझे मनोगत मांडतो.

प्रथम आभार मनावयाचे ते माझ्या प्रबंधाचे मर्गदर्शक कै. डॉ. वसंतराव कुलकर्णी यांचे. त्यांच्या सारखा चिकित्सक विद्वान या अभ्यासात मर्गदर्शक म्हणून लाभला हे मी माझे भाग्य समजतो. खंत आहे ती आज पुस्तकरूपाने हा ग्रंथ पाहाण्यास ते हयात नाहीत. त्यांच्याच स्मृतीस अभिवादन.

भारत गुणवर्धक संस्था हैदराबाद, या संस्थेतील पदाधिकारी श्री अरुण पोळ, कालीदास काशीकर इत्यादिनी मला कोरेकलांचे कातरकाम, हस्तलिखिते, कुटुंबियांचे फोटो, चित्रकलेचे नमूने दिले. त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.

सौ. व श्री. अप्पासाहेब बीडकर यांनी त्यांच्या संग्रहात जतन करून ठेवलेल्या कोरेकलांच्या दैनंदिन्याचा अमोल ठेवा मोठ्या आस्थेने दिला व अनेकांच्या भेटी घडवून दिल्या, त्याबद्दल त्यांचे मानावे तेवढे आभार थोडेच आहेत.

''लोकविजय'' प्रेसचे मालक श्री वा. ल. फाटक यांनी त्यांच्या संग्रही असलेले '' निजामविजय'' चे जुने अंक पाहावयास दिले. त्याबद्दल त्यांचा आभारी आहे. तसेच श्री विठ्ठलराव जहागीरदार यांनी कोरेकलांसंबंधी बरीच महिती दिली व त्यांच्या अनेक आठवणी सांगितल्या, त्यांचा या पुस्तकाच्या घडणीत खूपच उपयोग झाला. त्याबद्दल त्यांचे आभार.

माझी विद्यार्थिनी कु. मायादेवी वाघबीजे हिने रात्रंदिवस (DTP) कॉम्प्युटरवर छपाईचे काम करुन अल्पावधित हे पुस्तक तयार केले. त्याबद्दल आभार. माझे मेहुणे श्री विठ्ठल कुलकर्णी यांनी कागद, फोटो, पेंटींग जुळवण्यात मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार. मराठी महाविद्यालयातील माझ्यासर्व सहकाऱ्यांनी केलेल्या सहकार्याबद्दल मनपूर्वक आभार. प्रा. सौ. स्वाती वाटवे, श्री अमोल गाडगीळ, भाग्यश्री बल्लुरकर, संपदा वाकनीस, शुभदा वाकनीस, चि. योगेश, शरद, दीपक या सर्वांनी कार्याचा वाटा उचलला सर्वांचे मनःपूर्वक आभार.

**- लेखक**

श्री

संताची चरित्रे आणि सत्पुरुषांची चरित्रे ही माणसाच्या मनावर चांगले संस्कार करणारी मोठी श्रेष्ठ साधने आहेत. पण जगातील बरेचसे श्रेष्ठ अलौकिक पुरुष अज्ञात असे निघून गेलेले आहेत. त्यांच्या विषयी जगाला काहीच माहिती नाही. पुष्कळदा आपणास संतांची किंवा सत्पुरुषांची केवळ नावेच माहीत असतात. किंवा फार तर त्यांनी केलेला एखादा चमत्कार. पण ज्या उच्चतम वंदनीय अवस्थेपर्यंत ते पोहचले त्यासाठी त्यांनी केलेले कष्ट, त्याग, साधना, दोष जिंकून त्यांनी संपादन केलेले गुण, भूतदया, निष्ठा, सर्वांच्या हितासाठी असणारी तळमळ, सर्वत्र भगवत् स्वरूप पाहाणारी त्यांची व्यापक दृष्टी आणि मुख्य म्हणजे त्यांनी केलेले कार्य, याची ओळख फार थोड्या लोकांना असते.

यशवंत सदाशिव कोरेकल हे असेच एक अलौकिक पुरुष होऊन गेले. त्यांचे चरित्र व कार्य अंतःकरण पिळवटून टाकणारे आहे. ब्रह्मानंदासाठी तळमळणाऱ्या आत्म्याचा तो एक सुंदर अविष्कार आहे.

यशवंत सदाशिव कोरेकल यांचे मूळ घराणे कर्नाटकातील बिदर जिल्ह्यात ठाणे कुसनुर या गावाजवळील ''कोरेकल'' या गावाचे होय. या मूळ गावापासून श्री कोरेकल हैदराबाद येथे स्थानांतरीत झाले. याचे कारण हैदराबाद हे त्यांचे आजोळ म्हणजे आईचे माहेर होते.

जुन्या हैदराबाद शहरातील शालीबंडा या भागातील मुरादमोहल्ला या ठिकाणी त्यांच्या अजोबांच्या म्हणजेच त्यांचे मामा श्री विश्वेश्वर शास्त्री पोळ यांच्या घरात यशवंतरावांचा जन्म दिनांक १३ डिसेंबर १८८५ रोजी रात्री ३ वाजून २४ मिनिटांनी झाला.

त्यांच्या जन्माची कहाणीही मोठी विचित्र आहे.

त्यांचे वडिल सदाशिवराव यांना सुरुवातीस एकापाठी एक मुलीच होत गेल्या. पहिली मुलगी हरणाबाई, दुसरी राजाबाई व तिसरी माणिकबाई, यशवंतरावांच्या आई कृष्णाबाई जेव्हा चौथ्या वेळी गरोदर राहिल्या तेव्हा सदाशिवरावांनी वैतागून अशी प्रतिज्ञा केली की चौथे अपत्य जर पुत्र नसेल तर मी काशीवारा घेईन. पण चौथे अपत्यही गुलगीच जन्मली. तेव्हा नातेवाईकांनी रादाशिवरावांना त्यांच्या ऑफिसमध्ये गुलगाच झाला अरो खोटे रांगून त्यांना घरी आणले. काशीवासाची प्रतिज्ञा पुढच्या खेपेराठी ठेवण्यात रादाशिवरावांचे गन वळविले. या पाचव्या वेळी गात्र खरोखरच गुलगा झाला. तो गुलगा म्हणजेच यशवंतराव होत.

यशवंतरावांचे रार्व आयुष्य एका दृष्टिक्षेपात पाहिले तर असे दिसते की नियतीने एका रात्वशील गाणसाची घेतलेली परीक्षा आणि तीत आपले कष्ट, बुद्धि व निःस्वार्थवृत्ती, यांच्या राह्याने त्यांनी प्राप्त केलेले यश याची ही कहाणी आहे. जन्मानंतर केवळ आठच गहिन्यात त्यांच्या आई सौ. कृष्णाबाई कोरेकल यांचे निधन झाले. यशवंतराव गातृसुखास मुकले आणि पत्नीच्या मृत्यूनंतर अवघ्या चारच गहिन्यात म्हणजे यशवंतराव केवळ वर्षाचेच असताना यशवंतरावांचे वडील श्री सदाशिवराव कोरेकल यांचे निधन झाले आणि यशवंतराव अनाथ झाले. यशवंतरावांचे चुलत बंधू शेषराव हे हैदराबाद येथे असिस्टंट जनरलच्या पदावर नोकरीत होते. त्यांनीच पुढे यशवंतरावांचा सांभाळ केला. पण केवळ पालनपोषण म्हणजे जीवन नव्हे. जीवनाला अर्थ येण्यासाठी घरात मुलांवर माता-पित्यांच्या प्रेमाचे जे संस्कार व्हावे लागतात ते यशवंतरावांवर मुळीच झाले नाहीत. कारण या चुलत बंधू शेषराव यांच्या घरात यशवंतराव व त्यांच्या गावडांना एखाद्या अश्रितासारखी वागणूक मिळत अरो. वास्तविक यशवंतरावांच्या वडिलांना पेन्शनपोटी हैदराबाद सरकारकडून दरगहा २५ रु. मिळत होते आणि

शेषरावांचा पगारही भरपूर होता. तरी पण शेषरावांच्या लक्षात न येईल अशा रीतीने या मुलांना अनाथ म्हणून वागविले जाई. या गोष्टीचा फार मोठा परिणाम यशवंतरावांच्या स्वभावावर झाला. कोणावरही अवलंबून न रहातां स्वतःच्या पायावर उभे राहावे हे बाळकडू त्यांना त्यांच्या बालपणाने दिले. मग यशवंतराव स्वतःच स्वतःचे माता-पिता-गुरू-शिष्य सर्व काही झाले. स्वावलंबन हा त्यांच्या जीवनाचा मूलमंत्र ठरला.

बाळपणात पालनपोषण चांगले न झाल्यामुळे, त्यांच्या शरीरावरही परिणाम झाला. वयाच्या दहाव्या अंकराव्या वर्षापर्यंत यशवंतरावांना देवीच्या साथीने व पोटातील इतर अनेक रोगांनी ग्रासून टाकले होते.

बाळपणापासूनच पोरकेपण वाट्याला आल्यामुळे, पालनकर्त्या चुलतीने छळल्यामुळे आणि शारीरिक व्याधींनीही सतत त्रास दिल्यामुळे, त्यांना शिक्षणाचा फार मोठा लाभ घेता आला नाही. पोरक्या अवस्थेत रोगपीडित शरीर घेऊन यशवंतरावांचे बालपण कसेबसे खुरडत गेले. त्या काळातील पद्धती प्रमाणे, उर्दू फारशी आणि इंग्रजी या भाषांचे थोडेफार शिक्षण त्यांना लाभले. पण मॅट्रीकची परीक्षा पास होण्याचे भाग्य काही त्यांना लाभले नाही. त्यांचे चुलत बंधू शेषराव यांचे दि. १७-३-१८९८ रोजी निधन झाले व यशवंतराव अधिकच उघडे पडले.

चुलत बंधूच्या मृत्यूनंतर दोनच महिन्यात म्हणजे १५ मे १८९८ ला यशवंतरावांचा विवाह सखुबाई यांच्याशी झाला. विवाहाच्या वेळी त्यांचे वय अवघे १३ वर्षांचे होते व सखुबाईचे वय ९ वर्षांचे होते. पुढे पाच वर्षांनी यशवंतरावांना बुडम्मा उर्फ ताई उर्फ प्रभावती ही मुलगी झाली. आणि दोन वर्षांनी 'भाऊ' उर्फ शामराव यांचा जन्म झाला.

१९०६ साली यशवंतरावांना हैदराबाद येथे अकाउंट खात्यामध्ये खुशनविहाची नोकरी मिळाली. हळू हळू त्यांची दुर्दशा संपून त्यांना सुखाचे दिवस येऊ लागले. फोटोग्राफी आणि पेटीवादनात यशवंतरावांनी फार मोठे प्रावीण्य मिळविले होते. त्यांच्या बालपणाने त्यांना स्वावलंबन व जिद्द यांचे जे धडे दिले ते पुढील आयुष्यात त्यांना फार उपयोगी पडले. पुढे त्यांनी हे दोनच छंद जोपासले नाहीत तर चित्रकला, कातरकाम, सूक्ष्माक्षरलेखन, पोहणे, संगीत, पेटीवादन, पुतळे बनविणे, घोडेस्वारी इत्यादी अनेक छंद जोपासले व वाढविले.

पेटीवादनावर तर त्यांनी इतकी हुकुमत जमवली होती की मुंबईत नाट्यकला प्रवर्तक मंडळीतर्फे दि. १९-१०-१९११ ला त्यांचे जाहीर पेटीवादन झाले होते. मुंबईतील गांधर्व महाविद्यालयाच्या वार्षिक उत्सव प्रसंगीही त्यांच्या पेटीवादनाचा स्वतंत्र कार्यक्रम ठेवला होता आणि तो अत्यंत गाजला. त्यावेळच्या 'ज्ञानप्रकाश' व 'सांजवर्तमान' या वृत्तपत्रांनी त्यांची स्तुती केली होती. थोर गानमहर्षी व संशोधक आणि त्यावेळचे गांधर्व महाविद्यालयाचे प्राचार्य श्री विष्णू दिगंबर पलुस्कर यांनी कोरेकलांना त्यांच्या या वादनाबद्दल प्रशस्तीपत्र आणि रौप्यचषक देऊन त्यांचा गौरव केला होता. त्यावेळचे काही लोक आणि यशवंतरावांचे चहाते असेही सांगतात की साधा पोहणे हा प्रकार पण यशवंतरावांनी चिकाटी व मनोनिग्रह यांच्या बळावर त्यातही थक्क व्हावे असे कौशल्य संपादिले होते. बिछान्यावर सहज झोपावे तसे यशवंतराव पाठीवर पडून पाण्यात तासनतास तरंगत राहू शकत. त्यांचे हस्ताक्षर फारच सुंदर होते. यशवंतरावांचे परममित्र, सल्लागार व त्यांच्या वाङमयाचे प्रकाशक श्री अप्पासाहेब देशपांडे यांनी 'शांकभरी सहस्त्रनाम' हे पुस्तक सूक्ष्म अक्षरावर लिहून घेतले होते. यशवंतरावांच्या कातर कामाचे नगुने तर इतके लोकप्रिय झाले होते

की श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी राजेसाहेब औंध यांच्या राजवाड्यात आणि भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कचेरीमध्ये ते मोठ्या अभिमानाने ठेवले गेले होते.

कोरेकलांना रीतसर गुरू कोणी मिळाला नाही. त्यावेळचे सुप्रसिद्ध पेंटर व फोटोग्राफर "काळोजी" यांच्याकडे या विषयाचे थोडेसे शिक्षण यशवंतरावांनी घेतले. पण त्यातील नैपुण्य मात्र स्वतःच स्वतःचे गुरु बनून त्यांनी साध्य केले. बंकटराव या ग्रहस्थाचे कातरकाम पाहून यशवंतरावांना स्फूर्ती आली. पण बंकटराव आधीच मरण पावले होते. तेव्हा त्यांच्या कातरकामाचे नमुने मोठ्या कष्टाने मिळवून त्यावरहुकुम यशवंतराव कातरकाम शिकले. पेटीवादन देखील त्या वेळचे सुप्रसिद्ध दाजी तुळशी या गायक बंधूकडे ऐकून-ऐकून यशवंतरावानी ही कला आत्मसात केली व त्यातही त्यांनी प्रावीण्य मिळविले. हैदराबाद संस्थानाचे सहावे निझाम 'महबूब पाशा' यांचा पुतळा त्यांनी तयार केला होता. हा पुतळा परवापर्यंत त्यांचे एक स्नेही श्री विठ्ठलराव जहागीरदार यांच्याकडे होता. पुढे तो फुटून नष्ट झाला.

यशवंतरावांना खरा गुरू कोणी भेटला नाही. मात्र स्वतः गुरू बनून विविध क्षेत्रात अनेक शिष्य त्यांनी तयार केले. म्हणून यशवंतराव हैदराबाद मध्ये " गुरुजी" म्हणून ओळखले जायचे. बापूरिठेगळी, नारायणबक्षी, नारायणराव भैरव, नारायणराव पंत, कल्याणराव जोशी, ही त्यांच्या शिष्यांपैकी काही नावे सांगता येतील. त्यांचे इस्तारी नावाचे एक शिष्य तर अगदी अलीकडे पर्यंत यशवंतरावांचे श्राद्ध करीत असत.

यशवंतरावांची वृत्ती इतकी चिकित्सक व शोधक होती की कोणत्याही गोष्टीची ओळख ते तिच्या थेट गाभ्यापर्यंत जाऊन करून

घेत असत. त्यांच्या दैनंदिनीत असे असंख्य उल्लेख आढळतात की छोटे मनगटी घड्याळ, किंवा मोठे घड्याळ उकलून ते स्वतः दुरूस्त करीत असत. तसेच सुतारकामही ते स्वतः करीत असत. पुढे त्यांची पुस्तके प्रकाशित होऊ लागली. तेव्हा त्यांचा छापखान्याशी संबंध आला. त्यावेळी कंपोजिंग आणि प्रिंटिंगही यशवंतरावांनी शिकून घेतले. अखंड विद्यार्थीव्रत या एकाच शब्दात यशवंतरावांच्या जीवनाचे सार सांगता येईल. पण हा विद्यार्थी कोणत्याही शाळेत गेला नाही. पालक शेषराव यांच्या मृत्यूनंतर वयाच्या तेराव्या वर्षी त्यांची व शाळेची फारकत झाली. तेवढ्या काळात तत्कालीन अभ्यासक्रमाप्रमाणे ते उर्दू व फारशी शिकले. याच काळात इंग्रजीला झपाट्याने महत्व मिळू लागले होते. सर्व प्रकारचे नवीन ज्ञान इंग्रजीतून उपलब्ध होऊ लागले होते. यशवंतरावांसारखा जिद्दीचा माणूस ही संधी सोडणे शक्य नव्हते. त्यामुळे तर्खडकरांची तीन्ही भाषांतरे व तीन-चार इंग्रजी पुस्तके मिळवून कठोर परिश्रमांनी त्यांनी इंग्रजीवरही प्रभुत्व मिळविले. संस्कृत भाषाही त्यांनी याच पद्धतीने आत्मसात केली होती.

लेखनाची आवड यशवंतरावांना फार लहानपणापासूनच होती. वयाच्या अठराव्या वर्षापासून म्हणजे १९०३ पासून त्यांनी दैनंदिनी लिहिण्यास सुरूवात केली. ग्रंथवाचन करताना जिथे जी नवीन व रंजक माहिती मिळेल ती नोंदवून घेणे, टिपणं काढणे हे कार्यही ते सतत करीत असत. त्यातूनच पुढे केव्हातरी यशवंतरावांना काव्यलेखनाची स्फूर्ती झाली असावी, यांचे शालेय शिक्षण उर्दूतूनच झाले असल्यामुळे असेल किंवा हैदराबादेतील सरकार दरबारची भाषा ही उर्दू असल्यामुळे म्हणा यशवंतरावांची काव्य प्रतिभा प्रथम उर्दूतूनच प्रकट होऊ लागली. १९०९ पासून त्यांनी काव्य लेखनास सुरूवात केली.

आपल्या कष्टाळू व मितभाषी स्वभावामुळे अनेक व्यक्तींशी त्यांनी स्नेहाचे नाते निर्माण केले होते. त्यातील व्यंकट भाऊराव उर्फ तात्यासाहेब धनाश्री हे त्यांचे आते मेहुणे असून डेप्युटी अकाउंटंट जनरल होते . तसेच दातार साहेब* हे फायनान्स ऑफिसमध्ये डेप्यूटी फायनान्स सेक्रेटरी होते. त्यांचाही स्नेह यशवंतरावांना लाभला. सेवानिवृत्तीनंतर त्यांनी संन्यास घेतला म्हणून त्यांना दातार स्वामी म्हणत असत. कॅप्टन सूर्यप्रताप हेही त्यांचे स्नेही होते. एकदा उस्मानिया विद्यापीठात यशवंतरावांचे व्याख्यान अयोजित केले होते. हे ऐकून त्यांचे वरिष्ठ अधिकारी अन्सारी यांना यशवंतरावांचे फार कौतुक वाटले. दातारसाहेब अनेक वेळा यशवंतरावांना आपल्या खोलीत बोलावून अध्यात्मावर चर्चा करीत असत. एकूण यशवंतरावांचे मन नोकरीत फारसे रमत नसे. उपजीविकेचे एक साधन म्हणून केवळ कर्तव्य भावनेने यशवंतरावांनी नोकरी केली. कारण यशवंतरावांचे व्यसन होते वाचन-लेखन-भजन प्रवचन. आणि अनेक कलामध्ये रस घेणे. लेखन वाचनाचा नाद जसा त्यांना बालपणीच लागला, तसेच अध्यात्म विद्येची रूचीही त्यांना बालपणीच लागली.

यशवंतरावांना आध्यात्माची गोडी लागली याचे कारण म्हणजे त्यांचा माणिकनगर संस्थानाशी असलेला नाते संबंध होय. या संस्थानाचे मार्तण्ड माणिकप्रभू हे पीठाधीश, यशवंतरावांचे आतेभाऊ होते. तेव्हा यशवंतरावांच्या अनाथावस्थेचा बराच काळ माणिकनगरातच गेला. माणिकनगर संस्थानातील वातावरण भजन, पूजन, प्रवचने, उत्सव व उपासना यांनी सदैव गजबजलेले असे. या अध्यात्मिक वातावरणाचा

---

* व्यंकटेश माधव दातार यांनी केलेला उमर खय्यामचा रूबय्याचा अनुवाद प्रसिध्द आहे. त्यांनी रचलेला मराठी - उर्दू कोष मराठी साहित्य परिषद, हैदराबाद यांच्या संग्रहात आहे.

अत्यंत खोल ठसा यशवंतरावांच्या बालमनावर उमटला. म्हणूनच त्यांच्या गद्य असो की पद्य असो सर्व लिखाणात हा अध्यात्मिक प्रवृत्तीचा धागा कधी स्पष्टपणे तर कधी सूक्ष्मपणे आढळून येतो. पुढे १९ व्या वर्षी त्यांनी पत्नीसह माणिकप्रभूंचा उपदेश घेतला व या अध्यात्मिक मार्गात गुरुसहमतीने प्रवेश केला. श्री माणिकप्रभूंवर त्यांची भक्ती इतकी दृढ होती की त्यांनी आपल्या घराचे नाव " प्रभुदरबार " असे ठेवले होते.

माणिकप्रभूंना गुरु करून घेतल्यामुळे वेळ मिळेल तेव्हा व लहर लागेल तेव्हा यशवंतराव माणिकनगरास जाऊन रहात, श्री मार्तण्डमाणिक प्रभूंवर त्यांची विशेष श्रद्धा होती. प्रभूंनाही आपल्या या शिष्याविषयी फार कौतुक होते. अनेकदा यशवंतराव 'श्री' च्या पंक्तीस जात असत. या पंक्ती रात्री केव्हाही होत. श्री छपरात प्रभूंची जी गादी होती तिथे या गुरु शिष्यांचे अनेकदा बोलणे चाले, अध्यात्माची चर्चा होई. श्री यशवंतरावांना प्रवचन करावयास सांगत. दि. २२-२-१९३३ च्या त्यांच्या दैनंदिनीत नोंद दिसते की 'श्री' जी यशवंतरावांना म्हणाले " आधी बंदुकीतून गोळी सुटते नंतर आवाज येतो. तद्वत तुम्ही पहिल्या प्रवचनात म्हटल्याप्रमाणे आधी आत्मज्ञान, नंतर वस्तुज्ञान किंवा वाचारंभण. आमच्यावर पूर्ण विश्वास असल्यावर मुक्त आहातच अहा. आणखी कल्याण ते काय व्हावयाचे ". त्या नंतर दोनच दिवसांनी नोंद आहे, " दुपारी 'श्री'जींकडून बोलावणे आले म्हणून गेलो. रामबुवा देगलूरकर आलेले होते. मंत्रसाध्यासंबंधी भाषण निघाले तेव्हा 'श्री' जी म्हणाले , यशवंतरावच पहा. त्यांना वेदान्त कोणी शिकवला नाही, सदाशिवरावही या बाजूचे नव्हते. शेषरावांना तर वेदान्ताचा गंधही नव्हता. पण येथे पहा, जेवणं न खाणं, नेहमी हाच विचार. कविता, लेख, प्रवचन इत्यादी

कोणत्या ना कोणत्या रूपाने वेदान्त चालू असतो.'' गुरू शिष्यांचे असे मोठे आंतरिक संबंध होते,असे यावरून दिसते. तसेच १९३१ साली त्यांचे माणिकनगरास प्रवचन झाले. २१ मार्च १९३३ ला यशवंतराव लिहितात-'' दोन वर्षापूर्वी केलेल्या प्रवचनातील डोळ्यांनी ऐकणे, कानांनी पहाणे इत्यादी गोष्टीची 'श्री' जी मोठ्या संतोषाने गौरवपूर्ण शब्दात पसंती दर्शवितात. मला देऊ केलेला महादेवबाण काल पसंतीखातर दाखवला होता. आज सोवळे, पिवळा व लाल पितांबर द्यावे म्हणतो. दाखवून या असे बापूरावांना सांगितले, पिवळा पितांबर पसंत केला. रात्री बोलावणे पाठवून १० वाजता वेळ बरी, आहे असे पाहून '' पार्वतीपते हर हर महादेव'' या नामोच्चारात मानवटीसह बाण, सोवळे व अर्धा पाऊण तास मौंजीबंधन याज्ञिकावरील शास्त्र सांगून श्रीप्रभूंच्या सुवर्ण प्रतीकांची टोपीही दिली''.

या उल्लेखा वरून श्री मार्तण्डप्रभुंचा यशवंतरावांवर किती लोभ होता ते दिसते. त्यामुळे मार्तण्डप्रभूंच्या नंतर गादीवर कोणास बसवावे असा प्रश्न निघाला असता, काही लोकांच्या मते संस्थानचा कारभार यशवंतरावांना द्यावा असे वाटत होते. या संदर्भात कोरेकल आपल्या दैनंदिनीत लिहितात '' अकस्मिकरीत्या आबासाहेब पीलखाने नेहमीप्रमाणे भेटीस आले. आज सावचितपणे बराच वेळ बोलत बसले. त्यात हा एक प्रश्न आला की '' आपण संस्थानिक होणार ही वार्ता ऐकून आनंद झाला होता व योग्य योजना झाली असे वाटले. काही दिवस तर संस्थानिक झाला असे ऐकले होते.'' त्याचे उत्तर मी दिले की - '' प्रभूंनी मला निराळे स्वतंत्र क्षेत्र दिले आहे व आपल्या पायावर उभे राहण्याचे श्रेय दिले, हे महत्व काही कमी नव्हे. दीड दोन वर्षांनी प्रत्यक्ष संभाषणात ऐकलेली ही वार्ता थोडावेळ तरी पुनःपुन्हा निनादित होती. असो''.

या संदर्भात श्री अप्पासाहेब देशपांडे, कारभारी संस्थान माणिकनगर यांनी सांगितलेली माहितीही या गोष्टीस पूरक अशीच आहे. पण गादीवर बसण्याचा मान यशवंतराव अथवा अप्पासाहेबांना न मिळता शंकरप्रभूंना मिळाला हा इतिहास आहे. आणि अप्पासाहेब अथवा यशवंतराव या दोघांपैकी कोणालाच फारसे दुःख वाटल्याचे दिसत नाही. कारण दोघांनीही ती आशा ठेवलेली नव्हती. मात्र '' ही वार्ता थोडावेळ तरी पुनःपुन्हा निनादित होती. असो '' या यशवंतरावांच्या वाक्यावरून या गादीसाठी आपलेही नाव सुचविले जावे याचा आनंद व अभिमान यशवंतरावांना वाटत होता हे नक्की. यशवंतरावांच्या जन्माआधीपासूनच त्याचा या घराण्याशी संबंध आलेला होता. सदाशिवरावांची तिसरी कन्या माणिकबाई हिचा जन्म माणिकनगरास झाला. यशवंतरावांचे वडील सदाशिवराव हेही ईश्वर भक्त होते.

यशवंतरावांच्या अध्यात्ममार्गावरील प्रवास जसा सुरू होता, तसेच त्यांचे लौकिक आणि साहित्यिक जीवनही सुरू होते. त्यांच्या लौकिक जीवनात सुखापेक्षा दुःखाच्याच घटना जास्ती घडलेल्या दिसतात. इ. स. १९२३ ला यशवंतरावांच्या पुत्राचा विवाह झाला. सून दुर्गाबाई घरात आली पण विवाहानंतर अवघ्या चारच महिन्यात भाऊने म्हणजे यशवंतरावांच्या मुलांने आत्महत्या करून इहलोकाची यात्रा संपविली. त्यावेळी त्याचे वय अवघे १८ वर्षे होते.*

या घटनेमुळे यशवंतरावांच्या सांसारिक जीवनात प्रचंड उलथा-पालथ झाली. हे दुःख विसरण्यासाठी १९२४ ला ते बद्रीनारायणाची

---

* या आत्महत्ये संबंधी नक्की कारण समजले नसले तरी चौकशी केल्यानंतर असे समजले की मॅट्रीकमध्ये नापास झाल्यामुळे लोकनिंदा होऊ लागली म्हणून त्याने आत्महत्या केली.

यात्रा करून आले. या यात्रेनंतर त्यांनी घरी प्रवचने करण्यास सुरूवात केली. ही प्रवचने रोज रात्री होत असत व त्यात अनेक प्रकारचे विषय येत. पुराण- उपनिषदापासून नानाविध ग्रंथ यशवंतराव प्रवचनास घेत असत. १८ एप्रिल १९३८ ची त्यांच्या दैंनदिनीत नोंद आहे की " उपदेशसहस्त्री संपवून प्रस्थानत्रय नेहमीच चालू ठेवावे, अशा विचाराने ब्रह्मसूत्रावरील भाष्य आज सुरू केले. ग्रंथाना पुरणाचा नैवेद्य दाखविला." यावरून प्रवचन न प्रवचनीय ग्रंथांविषयी कोरेकलांचा आदर व श्रद्धा दिसून येते.

संसारिक दुःखाचा विसर पडावा म्हणून यशवंतराव भजन प्रवचनात वेळ घालवू लागले. तरी संसारिक दुःखानी काही त्यांची पाठ सोडली नाही. पुत्राच्या मृत्यूने खचलेल्या त्यांच्या पत्नी सखूबाई या चैत्र वद्य १३ शके १८४८ म्हणजे इ. स. १९२६ मध्ये यशवंतरावांचा संसार अर्ध्यावर सोडून निघून गेल्या व यशवंतरावांच्या जीवनातील उरले सुरले सुख नष्ट झाले. त्यानंतर यशवंतराव केवळ शरीरात प्राण आहेत तोवर जगायचे म्हणून जगत राहिले. त्यांनी त्या वेळपासून रोजचे जेवण जवळपास सोडून दिले. रोज काहीतरी निराहाराचे घ्यावे आणि फक्त सोमवारी सांयकाळी म्हणजे आठवड्यातून फक्त एक वेळ भजन पूजन झाल्यावर जेवण घ्यावे असा नियम यशवंतरावांनी सुरू केला. घरी बाई माणूस एकटी सून आणि तीही विधवा. तत्कालीन यमनियमाप्रमाणे विधवेच्या हातचे शिजवलेले अन्न चालत नसे. अशा परिस्थितीत त्या वेळच्या चालीरीतीप्रमाणे उत्तम उपाय म्हणजे यशवंतरावांनी दुसरा विवाह करणे हा होता. पण अध्यात्म मार्गात रमलेल्या यशवंतरावांना हा विचारही सुचला नाही व त्यांनी दुसरा विवाह करण्याऐवजी अन्नाचाच त्याग केला. सकाळ संध्याकाळ स्नानसंध्या करावी, सकाळी पार्थीव पूजा करावी, काही फलाहार घ्यावा,

शालीबंड्यावरून सायकलने बागेआम जवळील कचेरीचे अतंर काटावे, कचेरीत मान मोडून आपले काम करावे, उरलेल्या वेळात काही वाचन लेखन करावे, संध्याकाळी घरी येताच स्नान संध्या करावी, भजन प्रवचन करावे, आणि वेळ असेल त्याप्रमाणे तास दीड तास पेटी वादन करावे असा यशवंतरावांचा दिनक्रमच होऊन गेला.

यशवंतरावांना चहाची फार आवड. पण जिभेच्या या चोचल्याला प्रतिबंध घालण्यासाठी म्हणूनच की काय यशवंतरावांनी असा नियम केला होता की, चहा किंवा सोमवारचे जेवण सुद्धा कोणीतरी सोबतीला असल्याशिवाय घ्यावयाचे नाही. या संदर्भात एक प्रसंग असा की त्यांच्या पत्नी सखूबाई आजारी असताना डॉक्टरांनी त्यांना हवापालट करण्याचा सल्ला दिला. यशवंतराव त्यांना घेऊन शहरापासून दूर एका मारूतीच्या देवळात राहावयास गेले. एके दिवशी भयंकर वादळ झाले व सखूबाईची प्रकृती पुन्हा बिघडली, त्यावेळी यशवंतरावांना अगदी चार दिवस कडकडीत उपास घडला. चौथे दिवशी चहातरी घ्यावा म्हणून यशवंतरावांनी चहा उकळला पण बाहेर कोणी माणूस दिसेना. सांयकाळ होत चालली, पक्षी आपापल्या घरट्यात परतू लागले. निदान चिमणीने तरी चहा प्यावा म्हणून चहा ओतलेला द्रोण एका झाडाखाली ठेवून यशवंतराव दूर उभे राहिले. एका चिमणीने चहात चोच बुडविल्यावरच यशवंतरावांनी चहा घेतला''.

सोमवारचा स्वयंपाक बहुतेक हरणेक्का ही त्यांची आतेबहीण करून देई. सोमवारच्या पंक्तीला कोणीतरी सोबत असल्याशिवाय यशवंतराव अन्न घेत नसत. बहुतेक वेळा हरणेक्काचा मुलगा 'शेषा' हा सोबतीला असे. त्याने कधी उशीर केला तर यशवंतराव उपाशीपोटी त्याची वाट

पहात बसून राहात. पुढे पुढे ते प्रवचनाला येणाऱ्या शास्त्री किंवा माणिक्यम् यांना पंक्तीला घेऊ लागले.

यशवंतरावाचे पेटीवादनातले कौशल्य पाहून अनेकजन त्यांच्याकडे पेटी शिकण्यासाठी येत असत. त्याला यशवंतराव 'सल्यास येत' असा शब्द प्रयोग करीत. १९ मे १९३८ ची त्यांच्या दैनंदिनीत नोंद आहे की "अकल्पित सखाराम जोशी येऊन त्यांनी सल्ला घ्यावयाची इच्छा दर्शवली. आज आमावस्या म्हणून गुरुवारी येण्यास सांगितले." पेटी शिकण्यास येणाऱ्यात बापूचारी लखणे, नारायण देशपांडे, कलावती बावधीकर, शरयू परळीकर ही नावे आहेत. किशनराव तर पेटीवादनात चांगलेच तयार झाले होते.

यशवंतरावांची मोठी कन्या पद्मावती हिचा विवाह पांडुरंगराव चांगलेरकर यांच्याशी झाला होता. १९३२ साली तिला पहिली मुलगी झाली , पण ती वर्षाची होऊन वारली. पुढे या पद्मावतीला १९३३ साली 'ललिता', नावाची मुलगी आणि १९३६ साली " हरिओम्" नावाचा मुलगा अशी दोन मुले झाली. या नातवंडांवर यशवंतरावांचे फार प्रेम होते. ललिताचा 'लाल्या' असा उल्लेख ते करीत. हरिओम् वरतीही त्यांचे खूप प्रेम होते. आज घटकेला यशवंतरावांच्या नातेवाईकांपैकी यशवंतरावांचा हा 'हरिओम्' उर्फ व्यंकटराव चांगलेरकर हा एकच गृहस्थ हयात आहे. त्यांची भेट घेतली असता त्यांनी असे सांगितले की "त्यांची मुंज यशवंतरावांनी त्या काळात अत्यंत थाटाने करून दिली होती".

यशवंतरावांचा स्वभाव तसा थोडा हेकेखोरच होता. ते कोणत्याही गोष्टीवर लवकर चिडत. पण त्यांचा राग ते स्वतःलाच देहदंड करून काढीत. २३ जून १९३८ ची त्यांच्या दैनंदिनीतील नोंद अतिशय बोलकी आहे. ते लिहितात, '' आज गुरुवार म्हणून निर्जळी करावीच लागली. शिवाय पंचपाळी कंकू संपल्याचे किती दिवसापासून तरी सांगत होतो, ते कोणी न ऐकल्यामुळे उद्याही निर्जळी करण्याचा निश्चय केला''. असे गुरुवार, शुक्रवार दोन दिवस पाणी न पिता काढल्यानंतर शनिवारी रात्री १२ च्या सुमारास नोंद आहे.'' तीन दिवस तोंडात पाणी नव्हते म्हणून आज फराळाचे अर्धेही खाऊ शकलो नाही. शिवाय १२ वाजण्याची घाईही मागे लागली होती.'' व्हाईसरायच्या आगमनाच्या उत्सुकतेत, धामधुमीत कोरेकलांची सून कोरेकलांना फराळ देण्याचे विसरून गेली. तशीच झोपी गेली. कोरेकल ही हट्टी. त्यानीही तोंडाने मागितले नाही. ते लिहितात, '' रात्री १२.३० ला सूनबाई जागी होऊन निराहराचे घेण्यास्तव विचारू लागली, १२ च्या नंतर उपयोग काय ? अर्थात काहीही न घेताच झोपावे लागले.'' पण रिकाम्या पोटी कोरेकलांना झोप येत नसली पाहिजे तेव्हा नाईलाजाने त्यांनी आपला संताप गिळला. दैनंदिनीत नोंद आहे. '' पुन्हा दीड वाजता उठून चहा तरी द्या, असे मागावे लागले ''. चहा आणि धुम्रपान यांची त्यांना अत्यंत आवड होती. कोरेकल सतत कामात मग्न असत. दोन चार तास झोप घेतली तर घेतली नाही तर रात्र रात्र ते जागरण करीत. त्यामुळे इतरानीही असेच कष्ट करावेत असे त्यांना वाटे. तसे झाले नाही की ते स्वतःच मनस्ताप करून घेत असत.

आपल्या ठिकाणी काही विशिष्ट इच्छाशक्ती आहे असे कोरेकलांना वाटत असावे, असे त्यांच्या दैनंदिनीवरून दिसते. उदा. १५ जानेवारी

१९३८ ची नोंद आहे '' पेटीबद्दल रामच्याची आठवण गुरुवार पासून फार तीव्रतेने होत आहे. सूर जुळवण्या इतकी मला सवड होईतो एक नवीन पेटी मागल्या सारखी त्यांच्या मार्फत मागवू इच्छितो.'' त्या नंतर लगेच १७ जानेवारीस नोंद आहे '' आज आकस्मिकरित्या रामच्या ओव्हरशिअरची भेट झाली. तामीरातमध्ये आले असता माझी भेट घेण्यास मुद्दाम मजकडे आले होते. शुक्रवारी एक दोन पेट्या घेऊन येतो असे ते म्हणाले, तीव्र इच्छेचा परिणाम इतक्या लवकर दृष्टोत्पत्तीस आल्याचा प्रसंग अवर्णनीय वाटला''. याचप्रमाणे ४ आक्टोबर १९४३ रोजी नोंद आहे की, ''प्रेसमध्ये इलेक्ट्रीक नसल्याने बंद असेल असे घरी वाटत होते. प्रेसमध्ये जाऊन पाहातो तो खरेच इलेक्ट्रीक नव्हती.''

कोरेकल शिस्तप्रिय होते. त्यांनी लिहून ठेवलेल्या महावारी या जमाखर्चातही शिस्त दिसते. नमुन्या दाखल सप्टेंबर १९४३ या महिन्याचा जमाखर्च पुढील प्रमाणे आहे. जमेच्या बाजूला, '' मागील महिन्यातील शिल्लक ७४रू. व या महिन्याचा पगार ९४ रु १४ आणे आणि ॲडव्हान्स १२ रू मिळून १८४ रू १४ आणे जमा आहेत. त्या पैकी खर्च पुढील प्रमाणे. १ रू इनाम वगैरे, ८ आणे टांगा किराया, ४ आणे भोई इनाम, चार आणे शब्दरूपावली, एक रूपया दहा आणे चांदीचा खुळखुळा, ६ आणे चिल्लर खर्च. ४० रूपये सूनबाईस घरखर्चासाठी. पूर्वीच्या भोयाला पगार ४ रू सध्याच्या भोयाचा पगार ६रू. १ रू. भोयास ॲडव्हान्स, १० रू. दक्षिण लॉ रिपोर्टर प्रेसला, १ रू. वैदिकधर्म प्रकाशिका महिन्याची वर्गणी. २० रू. किराया. १ रू. घड्याळ दुरुस्ती. १ रू नवशिशू कमलाकर यांच्या हातावर, २० रू. सूनबाईस आणि ७ रू. भोयास ॲडव्हांस पगारी या प्रमाणे १२९ रू. महिन्याचा खर्च आहे. ६४ रू. १४ आणे शिल्लक आहेत.''

त्यावेळी हैदराबादेत जे मोठे लोक होते त्यांच्याशी कोरेकलांचा बराच जवळचा संबंध आलेला होता. नवाब मिर्झा यारजंग यांनी पत्र पाठवून मद्यपानाच्या दुष्परिणामावर कोरेकलांनी कविता लिहावी असे सुचवले होते व कोरेकलांनी ''मदिरा व्यसन'', ''मदिरा प्रभाव'' अशा दोन कविता लिहिल्या होत्या. शंकरराव मनसबदार यांच्याकडील कमीटीत एकदा यशवंतरावासंबंधी चर्चा निघाल्यावरून कुणी महंमद अकबर साहेब हे वकील भेटण्यास आल्याचा उल्लेख त्यांच्या १४ मे च्या दैनंदिनीत आहे. र. मु. जोशी पुराभिलेख कार्यालय (दफ्तर दिवाणी) संचालक पदावर होते. ते आणि उस्मानिया विद्यापीठातील मराठी विभाग प्रमुख प्राचार्य र. म. भुसारी या दोघांशी तर कोरेकलांचा फारच घनिष्ठ संबंध जुळून आलेला होता. हैदराबादेतील श्रीमंत रायरायान यांच्याकडून कोरेकलांना वारंवार बोलावणे जात असे. श्रीमंताच्या घरातील बाईसाहेबही कोरेकलांना नेहमी बोलवत असत. त्या कोरेकलांच्या सुंदर अक्षरात श्लोक लिहून घेत असत. २२ जुलै १९३८ ची कोरेकलांची नोंद आहे '' वाड्यातून बोलावू आल्यामुळे गेलो. रेंगेचे कोणी आप्त कवी तेथे आलेले होते. त्यांची भेट श्री बाईसाहेबांनी करवली. माला बादशहाचे लग्न डिसेंबर मध्ये आहे तेव्हा हिन्दू विवाह महत्व दाखवणारी उर्दू काही वाक्ये दोन-चार ओळीत लिहून आणण्यास त्यांनी सांगि तले. श्री बाईसाहेबांनी संबंध बाग मला दाखविली.. मैना '' आबा राजा भादूर '' ही अक्षरे खोल आवाजात पण अगदी स्पष्ट बोलते'' त्यांच्या वाड्यावरील भेटी वाढतच गेलेल्या दिसतात. एकदा श्रीमंतानी दोन पाट टाकून चहा स्वतः आणून दिला असा उल्लेख ते करतात, तर पुढे बाईसाहेबांनी आशिर्वादपर श्लोक मागितला. शिवाय बाईसाहेबांनी शालीबंड्यावरील विठोबाच्या मंदिरात माझे प्रवचन ठरविले, असाही उल्लेख कोरेकल करतात. मात्र या

थोरामोठ्यांशी आपली ओळख आहे याचा कोरोकलांना जसा अभिमान वाटे तसाच कधी कधी त्यांच्या दुटप्पीपणाचा रागही येई. १० जानेवारी १९४३ रोजी कोरेकल लिहितात " ९ वाजता समजले की हणमंतराव खजानदार वारले. श्रीमंत स्वतः सात आठ दिवस नित्य येत होते. आज तर स्वतः उभे राहून मंत्राग्नी देवविला व हाताचा टेका देवून फाटकापर्यंत प्रेतयात्रेमध्ये बरोबर होते. अशावेळी भुमन्नांच्या वेळीही असाच काही प्रकार झालेला आढळला पण पीलखाने दादासाहेबांच्या वेळी मात्र ढुंकूनही न पाहिल्याचे, विसरणे शक्य नाही." श्रीमंताच्या या दुटप्पी वागण्यावरची प्रतिक्रिया म्हणून कोरेकल आणखी एक वाक्य पुढे लिहितात, " साधेपणाच बरा पण तो सार्वत्रिक असावा". हैदराबादशिवाय बाहेरील साहित्यिक व सांस्कृतिक जगाशीही कोरेकलांचा चांगलाच ऋणानुबंध होता.

१९४३ सालापासून कोरेकलांनी नियमाने योगासने सुरू केली होती. तसेच आपण वाचलेल्या विविध पुस्तकांची नोंदही कोरेकलांनी ठेवलेली दिसते. त्यात १५२ पुस्तकांची नोंद आहे. हिन्दी आणि संस्कृत ग्रंथही त्यात आहेत. वादविवेचन मालेतील १२ पुस्तके, मार्कस्च्या कॅपिटलचा श्री पां. वां. गाडगीळांनी केलेला सार अनुवाद, टागोरांच्या गीतांजलीचे उर्दू भाषांतर, मुसलमान रियासत, मराठी रियासत इत्यादी २८ इतिहासाची पुस्तके आणि मराठीतील त्या काळात गाजलेल्या कथा, क़ादंबऱ्या इत्यादींचा त्यांच्या पुस्तकात समावेश आहे. त्यापैकी काही पुस्तकांवरील यशवंतरावांचे अभिप्राय उल्लेखनीय आहेत. त्याचे काही नमुने पुढील प्रमाणे देता येतील.

१९ जून १९४३ ला कोरेकल लिहितात "विहंगवृंद ( नाथमाधव) पूर्ण वाचून काढले. वाचकांना अंतरात घेऊन कथानकांची गुंतागुंत योग्य परिणामकारक करण्याची हातोटी, चिमणरावांचे चऱ्हाट

( चि. वि. जोशी) चित्तवेधक मर्यादित विनोदात्मक असल्यामुळे एक अक्षरही न सोडता किंबहुना एक दोन भाग वरचेवर वाचावे ते वाटल्यावरून ( पुन्हा वाचले) या उलट १९ डिसेंबर १९४३ ची नोंद आहे ''राणी की रखेली ( वि. वा. हडप) ही सदभिरूचीला व मर्यादेला सोडून बहकलेल्या लेखणीने लिहिलेली कादंबरी संपवली. इतकी घृणा, इतका कंटाळा इतर कसल्याही पुस्तकातून अनुभवाला आला नाही.'' कोरेकरांची टापटीप व शिस्त इतकी की त्यांनी आपण वाचलेल्या त्या वर्षीच्या प्रत्येक पुस्तकाची नोंद व लेखकाचे नाव, पृष्ठसंख्या व शक्य तिथे किमंत व प्रकाशन वर्षही नोंदवून ठेवले आहे.

यशवंतरावांनी बद्रिकेदारच्या यात्रेनंतर प्रवचने सुरू केली. याचा उल्लेख मागे केलेलाच आहे. प्रवचनाप्रमाणेच यशवंतराव कीर्तनेही करत व त्यासाठी अनेकदा स्वतःच आख्याने रचत. यशवंतरावांचे पहिले स्वकृत आख्यान म्हणजे ''ध्रुवाख्यान'' होय. या आख्यानाकरीता त्यांनी विविध ठिकाणाहून गोळा केलेल्या असंख्य पौराणिक, सामाजिक व राजकीय भौगोलिक नोंदीच्या वह्या उपलब्ध आहेत. या आख्यानाकरीता प्रामुख्याने हिंदीतून आणि काही प्रमाणात मराठीतून यशवंतरावांनी पद्यरचना केली होती. परंतु १९२३ सालापर्यंत म्हणजे वयाच्या ३८ व्या वर्षापर्यंत यशवंतरावांचे लेखन प्रामुख्याने उर्दूतून झाले असे दिसते. त्यांचे हे उर्दू काव्य लेखन चालू असतानाच त्याला मिळणारी मान्यता व 'उर्दू शायर' म्हणून यशवंतरावांना मिळणारा लौकिक पाहून हैदराबादमधील एक्सलेशियर शाळेचे संस्थापक श्री भाऊसाहेब केसकर*, यांनी यशवंतरावांनी मराठीतूनही लेखन करून मातृभाषेचे ऋण फेडले पाहिजे

* माजी आकाशवाणी मंत्री कै. बाळकृष्ण केसकर यांचे वडील.

असे म्हटले. यशवंतरावांनाही ते पटले व त्यांनी मराठीतून गद्य-पद्य लेखनाला सुरूवात केली.

मासिक " मनोररंजनच्या" १९२३ च्या अंकांत, " की वेडे सगळे मिळूनी बाजार हा मांडिती" ही यशवंतरावांची कविता प्रथम प्रसिद्ध झाली. यशवंतरावांनी सगळे साहित्य पदरमोड करुन स्वतःच प्रकाशित केले. त्यांच्या ग्रंथावर प्रकाशक म्हणून जरी माणिकनगर संस्थानाचे नाव असले तरी संस्थानाने पुस्तक प्रकाशनासाठी काही खर्च केला नाही. तो सगळा खर्च यशवंतराव स्वतःच्या खिशातूनच करीत असत. त्यांच्या ग्रंथावर प्रकाशक म्हणून ज्यांचे नाव आहे, त्या श्री आप्पासाहेब देशपांडे महाराज यांनीही आपल्या मुलाखतीत सांगितले. यशवंतरावांच्या दैनंदिनीतही अनेक ठिकाणी, कागद, प्रेसची बिले इत्यादीसाठी केलेल्या खर्चाच्या नोंदी आहेत. कागद विकत आणणे, त्याचे हवे त्या आकाराचे तुकडे कापून प्रेसला देणे अशी कामेही यशवंतरावांना करावी लागत. प्रुफ रीडींग, छापल्या गेलेल्या चुका घरी त्या त्या अक्षराचे खिळे आणून प्रत्येक पानावर दुरुस्त करणे, जिथे दुरुस्ती अशक्य असेल तेथे चिठ्या चिटकवणे व हे पुस्तकाच्या प्रत्येक पानावर चिटकवणे अशी अत्यंत किचकट कामे यशवंतरावांनी वर्षानुवर्षे केली.

आपले पुस्तक " काव्यकुसुम कलिका". उस्मानिया विद्यापीठाने इंटर मिडियटच्या परिक्षेस नेमले असे समजताच यशवंतरावांनी मुद्रणदोषानी भरलेले ग्रंथ विद्यार्थ्यांच्या हाती जाऊ नयेत म्हणून अत्यंत काळजीपूर्वक, प्रत्येक पानावर स्वतः छापखान्याच्या खिळ्यांनी दुरुस्त्या करण्याचा प्रचंड उद्योग केला. चाकूने चुकीचे अक्षर पूर्णपणे खरवडून काढावयाचे व तेही अशा कौशल्याने की कागद फाटू नये. त्यानंतर त्या

जागी योग्य अक्षर प्रेसमधून आणलेल्या खिळ्यांनी उमटावयाचे असा हा दुहेरी उद्योग असे. ''काव्यकुसुम कलिका'' या काव्यग्रंथाच्या पानापानावरती अशा दुरूस्तीच्या खुणा दिसून येतात. या कामात त्यांना त्यांच्या सुनेचेही मोठी मदत होई, असे त्यांच्या दैनंदिनीवरून दिसते.

कोरेकलांचे साहित्य ज्या छापखान्यात छापले जाई तिथे मुख्यत्वे उर्दू व इंग्रजी छपाई चालत असे. '' दक्कन लॉ रिपोर्टर प्रेस, हैदराबाद'' या छापखान्यात कायदे विषयक रिपोर्ट छापले जात. विलीनीकरणपूर्व स्वतंत्र हैदराबाद संस्थानाचे एक मंत्री, नामदार विनायकराव कोरटकर विद्यालंकार यांच्या मालकीचा हा छापखाना होता. यशवंतरावांचे साहित्य छापण्यासाठी म्हणून कोरटकरांनी आपल्या प्रेसमध्ये मराठी विभाग खास सुरू केला. तसे यशवंतरावांचे पहिले पुस्तक ''काव्यकुसुम कलिका'' पुण्याच्या '' श्री गणेश मुद्रणालय, पुणे'' येथे छापले गेले पण त्यात इतक्या चुका राहिल्या गेल्या की पुढील भाग हैदराबादेस छापला गेला तरच प्रुफ रिडिंग व्यवस्थित होऊ शकेल असे वाटल्यावरून श्री अप्पासाहेब देशपांडे (प्रकाशक) यांनी कोरटकरांना मराठी विभाग सुरू करण्याची सूचना केली व त्याप्रमाणे कोरटकरांकडेच कोरेकलांचे सर्व ग्रंथ छापले गेले. कोरेकलांचे आपल्या या ग्रंथावर अत्यंत प्रेम होते. त्यांच्या प्रसिद्धीसाठी त्यांनी अर्थिक झीज तर सोसलीच पण शारीरिक कष्टाचीही पर्वा केली नाही. हैदराबादेत जसे कोरेकलांचे चाहते होते, तसेच त्यांचा मत्सर करणारेही लोक होते. अशाच कोण्या एका रावसाहेबांची नोंद यशवंतरावांच्या दैनंदिनीत आहे. २९ जानेवारी १९४३ च्या दैनंदिनीत ते लिहितात '' समजले की ब्यॅ. बिना. रावसा. कोरेक. सा. चे मुद्रण बंद करण्यास सांगितले होते ना? असे विचारल्यावरून ते रकमा देतात, कागद

आणतात, प्रेसची सोय होते, मग बंद काय म्हणून? या उत्तरावर "हल्या" शांत झाला." कोरेकलांसारखा सात्विक माणूस ही आपल्या ग्रंथाची छपाई बंद करू पहाणाऱ्या या मनुष्याला "हल्या" अशी शिवी देतो. या वरून त्यांना वाटलेली चीड व ग्रंथाविषयाचे प्रेम व्यक्त होते. २३ फेब्रुवारीस नोंद आहे - " दिगंबरराव पैठणकरांची भेट झाली. प्रत्येक हालचालीतून अनादर स्पष्ट होतो." या वरून कोरेकलांचा मत्सर करणारे लोकही होते असे दिसते. पण असे लोक फारच थोडे होते. हैदराबादेत कोरेकलांना मोठा मान होता. अनेक सभासंमेलनाचे अध्यक्षपद त्यांच्याकडे येई. १९३३ साली हैदराबाद येथे सनातन धार्मिक सभेचे संमेलन भरले होते. त्याचे अध्यक्ष यशवंतराव कोरेकल होते. "सरस्वतीचा कंठमणी" मध्ये या संदर्भात असा उल्लेख आहे की, 'पंडित नित्यानंदजी पुराण श्राद्ध आणि अवतार' या विषयावर व्याख्याने चालू असताना एक दिवस विरोधकांनी फारच दंगल माजविली, पण अध्यक्षाच्या समय सूचकतेमुळे कोणत्याही प्रकारचा बखेडा न माजता सर्व काम सुरळीतपणे पार पडले. शेवटच्या दिवशी पंडितजीनी "प्रबलप्रतापी" असा गौरवपर उल्लेख करून यशवंतरावांना धन्यवाद दिले.

तात्यासाहेब धनाश्री हे भारत गुणवर्धक संस्थेचे अनेक वर्ष पदाधिकारी असल्यामुळे तेथील कार्यक्रमांना यशवंतरावांना नेहमीच आमंत्रण असे. ४ फेब्रुवारी १९३८ ला भारत गुणवर्धक संस्थेच्या वार्षिक उत्सवात यशवंतरावांच्या अध्यक्षतेखाली कविता गायन झाले. तसेच पुढे १९४३ सालच्या दैनंदिनीतही भारत गुणवर्धक संस्थेच्या कार्यक्रमाची नोंद आहे की " आजच्या संस्कृति निमित्त भारत गुणवर्धक संस्थेत कार्यक्रम ठेवल्याची यादी सहीस्तव आली. पावणेसात वाजता चि. दिगंबर

सूरूवातीची सुचना देण्यास आले. संस्थेत पुण्याचे वैद्य पंचानन कवडेशास्त्री यांना आजचे अध्यक्षपद देऊन प्रवचनार्थ पीठावर येताच प्रथम काव्यगायनाचा कार्यक्रम मजकडूनच सुरू झाला. बाजूस फळा होता. खडूने अंतरलापीकालंकार देण्यास दि आणि धी अक्षरे काढून दाखवताच टाळ्यांचा कडकडाट झाला. राजेश्वरचे मार्तण्डराव कुलकर्णी आणि त्रिंबकराव देशपांडे यांनी मजवर कविता रचलेली म्हणून दाखविली. कृष्णाजी नाईक, फाटक, ब्रह्मे, नीळकंठशास्त्री वगैरे आले होते. भाग घेणाऱ्यांना सरसकट हार मिळाले.''

नाशिकच्या वसंत व्याख्यानमालेत १९३३ साली यशवंतरावांचे व्याख्यान झाल्याची व ते तेथील मंडळीना खूप आवडल्याची नोंद ५ मे १९३३ च्या दैनंदिनीत यशवंतरावांनी केलेली आहे. यशवंतरावांच्या वक्तृत्वगुणावर नाशिक येथील व्याख्यानाने शिक्कामोर्तब केले. त्या दिवशीची संपूर्ण नोंदच यशवंतरावांच्या स्वभावावर प्रकाश टाकणारी आहे. ती नोंद अशी-

'' पांगारकरांकडून माईसाहेबांकडे गेलो. त्यांच्या कन्या गोदावरीबाई गायधनी यांच्याकडून एक पद ऐकवले. ५-३० वाजता पांगारकर माझ्या भेटीस आले. ६-३० पर्यंत बसले. काही कविता वाचून व ऐकून रोमांचित झाले व मोकळ्या हृदयाने गौरवोद्गार काढले. श्रीरामाचे दर्शन घेऊन पोहोचल्यावर यशवंतराव महाराजांच्या पटांगणावरील व्याख्यानाच्या जागी गेलो. अध्यक्षपदी नाशिकची मान्यवर व्यक्ती श्री रामराव हे होते. वक्त्याचा अधिकार व विद्वत्तेच्या मानाने पाहू गेल्यास मी या पदास अंशतःही पात्र नाही इत्यादी विनययुक्त भाषण करून १५.२० मिनिटे चरित्रात्मक माहिती जनतेला करून दिली. ७-१५ वाजता मी

व्याख्यानास उभा राहिलो. ८-४५ पर्यंत म्हणजे नियोजित वेळेहून जवळ जवळ अर्धातास ज्यास्त घेतला तरी पण जनसमाज उत्सुक व तटस्थ बसलेला होता. हजार पाचशे जनसमूह होता. दोन तीनशे तर स्त्रिया होत्याच होत्या. दोन अडीचशे पुरूष तर उभेच होते. व्याख्यान संपेतो एकही उठून गेला नाही किंवा ऊभे असलेल्या पैकी परतला नाही. आभार प्रदर्शन आज अगदी नवख्या रहाळकर नामे गृहस्थाने केला. नेहमी कानिटकर वकील हे या आठवड्याचे कार्यकारी होत. त्या पैकी रहाळकर आभार मानताना म्हणाले की '' वक्त्याच्या भाषणाचा जो अमूल्य लाभ नाशिक जनांना मिळाला त्याबद्दल यथायोग्य शब्दात आभार मानण्यास मला शब्द अपुरे वाटतात. भांड्यातले पुरेसे बोर मुठभरून घेतल्यावरही जसे काढून दाखवता येत नाहीत. तशी माझी सध्याची मनःस्थिती आहे. श्री रामगोसावीला मी म्हटले की, स्तुत्यात्मक फार बोलता ? त्यावर ते म्हणाले माझे असे दोन तीन दिवसाचा तरी परिचय आहे. पण आजचे आभार माननारे अगदी नवखे ना ? त्यांच्या हृदयात सुद्धा आपल्याबद्दल किती आदर भरला होता. हे आज दिलेल्या बोराच्या उदाहरणावरून स्पष्ट होते. शिवाय आम्ही रोज पहातो ना एकही माणूस इकडचा तिकडे होत नाही. शिवाय येथील सांप्रदायानुसार चर्चेला दोन तीन उपवक्ते उभे राहाताताच. आज दोन तीन वेळा सूचवूनही कोणी धजला नाही. तितका अधिकार लागतो. एकूण छान झाले''.

वरील नोंदीवरून यशवंतरावांना नाशिकच्या व्याख्यानाने दिलेला मानसन्मान व त्याचा यशवंतरावांना वाटणारा अभिमान उत्तम तऱ्हेने प्रगट होतो. वयाच्या १३ व्या महिन्यापासून अनाथ म्हणून वाढलेला एक दुर्दैवी मुलगा अशा रीतीने महाराष्ट्रबाहेर मराठीची सेवा करीत स्वतःच्या कर्तृत्वाने

इतका मोठा होतो की वसंत व्याख्यानमालेसारखी प्रतिष्ठित संस्था त्यांना व्याख्यानाला बोलावून त्यांचा आदरसत्कार करण्यात धन्यता मानते.

नाशिक प्रमाणेच पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेतही यशवंतरावांचे व्याख्यान झाले. महाराष्ट्र सांवत्सरिक, इंडियन हूज- हू, महाजन परिचय, राजहंस मासिक, साहित्य संमेलन विशेषांक वगैरे ठिकाणी यशवंतरावांबद्दल गौरवपूर्ण माहिती छापून आलेली आहे. त्यांच्या सर्व काव्यसंग्रहावर तत्कालीन सर्व प्रतिष्ठित लोकांनी व वृत्तपत्रांनी उत्तम अभिप्राय प्रसिद्ध केलेले दिसतात.

यशवंतराव असे साहित्य सेवेत मग्न असतानाच, देशात स्वातंत्र्यासाठी लढा दिवसेंदिवस तीव्र होत चालला होता. यशवंतरावांच्या ठिकाणी धर्माप्रमाणेच देशप्रेमही उत्कट होते असे त्यांच्या अनेक कविता मधून दिसते. यशवंतराव केवळ वाचाशूर देशभक्त नव्हते. महात्मागांधीच्या राजकारणाचा त्यांच्यावर फार मोठा परिणाम झालेला होता. असे त्यांच्या दैनंदिनीवरून दिसते. १९३३ च्या प्रारंभीचे चार महिने यशवंतराव सुट्टी घेऊन मणिकनगरास राहिले आणि तेथे वेळात वेळ काढून सारखे सूत काढीत व वीणकरास स्वतः १६ तोळे सूत उपरणे विणण्यास दिल्याचा उल्लेख आढळतो. स्वतः यशवंतराव खादीचेंच कपडे वापरीत. स्टेट काँग्रेसच्या सत्याग्रहाचे बारीक सारीक उल्लेख व त्या खेरीज कैदेत गेलेल्यांचे उल्लेख त्यांच्या दैनंदिनीत आढळतात.

निजाम पोलिस व जनतेत होणाऱ्या मारामाऱ्याचीही वर्णने आहेत. २७ ऑक्टोबर १९३८ चे वर्णन नमुन्या दाखल असे आहे. ''कचेरीहून प्रेस व प्रेसहून घरी येताना अफजलगंज हॉस्पीटलात ३०,४०

पोलीस लांब काठी घेऊन पळत चालल्याचे पाहिले. प्रेसमधे ऐकले की शामलाल वारला व त्याचे प्रेत लोक मागत आहेत. नंतर समजले की दसऱ्याच्या दिवशी उदगीरमध्ये गोळी खाल्लेला माणिकराव बिदरकर (वाणी) हा उस्मानिया दवाख्यान्यात वारला. त्याच्या प्रेताबद्दलची मागणी नाकारल्यामुळे लोकांनी अंबोलीयन कार (अँबुलन्स) फोडली, मोडली, व बरीच गर्दी केली''. अशी नोंद आढळते. दि. १० फेब्रुवारी १९४३ रोजी यशवंतराव लिहितात. '' महात्मा गांधीजी आजपासून २१ दिवसाच्या उपोषणास बसले. त्यांची प्रकृती बरी आहे. काल झोप चांगली लागली. पैत्य उठलेले दबले,'' अशी मुद्दाम लाल शाईत ते नोंद करतात. त्यांच्या नेहमीच्या बैठकीतील माणिक्यम व शास्त्री यांच्याशी महात्माजीच्या संदर्भात पुष्कळच वादावादी चाले. दि. १७ फेब्रुवारीस यशवंतराव नोंदवतात महात्माजीची प्रकृती बिघडत चालली असे ऐकण्यात आले. शास्त्रीही केन्हा केन्हा माणिक्यम्‌ची साथ करीत असल्यासारखे दिसतात.

२४ फेब्रुवारीस यशवंतराव लिहितात '' महापूजेतून येताना शास्त्री व माणिक्यम्‌नी महात्मा संबंधी विपरित (शोकभरीत) बातमी सांगितली. माणिक्यम्‌नी मनसोक्त दोषारोप लावले. महादेव देसाईची म. आठवण काढतात या वरून ही हकिकत उठली किंवा उठविली असावी.'' स्वातंत्र्यसैनिकाविरुद्ध खटले चालत, त्यातही कोरेकल रस घेत असत व त्या खटल्याची प्रगती समजून घेत असत असे दिसते. याच राजकारणात उघड भाग घेणे यशवंतरावांना निजाम सरकारच्या नोकरीत सेवेला असल्याने शक्य नव्हते.

सामाजिक कार्य व सामाजिक सुधारणा यांचीही कोरेकलांना आवड होती. कोरेकलांच्या शिष्य व चाहात्याच्या परिवारात ब्राह्मणाशिवाय

इतर जातीची माणसे बरीच होती. आपल्या भजन पूजनाकडे वैदिक ब्राह्मण लोक येत नाहीत याची कोरेकलाना खंत होती. स्वतः कोरेकलांचा दिनक्रम कर्मठ होता. पण वृत्तीमात्र सर्व लोकांमध्ये मिसळावे अशी उदार होती. नोकरी व उर्दू लेखन यामुळे त्यांचा अनेक मुसलमानांशी संबंध आला. अनेक मुसलमान त्यांच्या घरीही नेहमी येत असत.

लौकिक जीवनात कोरेकलांना आदर व मानसन्मान मिळाले. साहित्यिक जीवनात अनेक पदव्या व प्रतिष्ठा मिळाली आणि पारमार्थिक जीवनात श्रीमन मार्तण्ड माणिक प्रभूंचा पूर्ण कृपा प्रसाद लाभला.

यशवंत कोरेकल यांचे लौकिक जीवन व त्यांचे लिखाण यात बराचसा सुसंवाद आहे. त्यांचे व्यक्तिमत्व दुःखाशी धीरोदात्तपणे झगडणारे, स्वावलंबनाचा मंत्र जपणारे, स्वाभिमानी, प्रेमळ, रसिक आणि अनेक कलांमध्ये प्राविण्य मिळविणारे होते, असे दिसते. पण याही पलीकडे जाऊन त्यांच्या व्यक्तिमत्वाला भारतीय तत्वज्ञानाचे अधिष्ठान लाभलेले असल्यामुळे इतर चार चौघा सामान्य माणसापेक्षा कोरेकलांचे व्यक्तित्व कितीतरी उदात्त होते. त्यामुळे हैदराबादमध्ये तरी '' भटजीबापू नंतर गेल्या ५० वर्षात हेच थोर पुरुष झाले''. असा त्यांच्या व्यक्तिमत्वाचा गौरव त्या काळात झालेला होता.

लौकिक जीवनात कोरेकल हे जसे साधु पुरुष म्हणून विख्यात होते, तसे वाङ्मयीन जीवनात कवी, कथाकार, नाटककार आणि गद्य स्फुटलेखक म्हणून ते प्रसिद्ध होते. हे सर्व वाङ्मयप्रकार त्यांनी केवळ मराठी भाषेतच नव्हे तर हिन्दी, उर्दू या भाषांमधूनही लेखन करून आपले बहुभाषा कोविदत्व सिद्ध केले आहे.

यशवंतरावांनी गद्य स्फुट लेखन पुष्कळच केले आहे. त्यात तत्वज्ञान समजावून सांगणारे लेख जसे आहेत तसेच वाङ्‌मय चर्चात्मक लेखही आहेत. सभासम्मेलनात दिलेल्या व्याख्यानांना कोरेकलांनी मुद्रित रूप दिले आहे तर प्रहसने आणि नाट्यछटा यांचाही त्यांच्या गद्य लेखनात समावेश आहे. याशिवाय अनेक ललित लेखही कोरेकलांच्या स्फूट गद्य लेखनात समाविष्ट करावे लागतील. मराठी प्रमाणेच हिन्दीतूनही त्यांचे गद्य लेखन आढळते. त्यात प्रामुख्याने ज्ञानमार्तण्ड या ग्रंथाचा हिन्दी अनुवाद, ''सुधांशु'' आणि ''यशोबिम्ब'' या ग्रथांचा समावेश आहे.

कोरेकलांनी आपल्या लेखनाचा प्रारंभ उर्दू भाषेतून केला. '' सोजो साज'' उर्फ ''कलामे मुसरत'' हा त्यांच्या उर्दू काव्याचा संग्रह प्रसिद्ध आहे. उर्दू वाङ्‌मयानुसार हा काव्यग्रंथ ''दिवाण'' या वाङ्‌मयप्रकारात मोडतो. खरे म्हणजे ''दिवाण'' लिहिणे ही गोष्ट उर्दू शायरांना सुध्दा मोठी कठीण वाटते. पण कोरेकलांनी ''सोजोसाज'' मध्ये हा काव्यप्रकारही इतक्या सहजपणे हाताळून दाखवला आहे की त्यामुळे या ग्रंथाला उर्दू वाङ्‌मयात अत्यंत लोकप्रियता व कौतुक लाभले. या ग्रंथाला हिज एक्सेलेन्सी (His Excellency) महाराजा सर किसनप्रसाद बहादुर के. सी. आई. इ. जी. सी. आई. ई (K. C. I. E. G. C. I. E.) यांची अत्यंत मार्मिक विद्वतापूर्ण व कोरेकलांचे साहित्यगुण उलगडवून दाखवणारी प्रस्तावना लाभली आहे. आपल्या प्रस्तावनेत सर किशनप्रसाद बहादुर म्हणतात, ''साहित्य क्षेत्रातही यशवंतराव केवळ सैनिक नाहीत तर शाही घोडेस्वारासमान (रथी-महारथी) यांची धाव आहे--''नुसरत'' साहेबा (उर्दू कवितेतील रा. यशवंतरावांचे टोपण नाव) हे विशेषत्व आहे की हे ब्राह्मण, त्यातही दक्षिणी ब्राह्मण असून दोन्ही

भाषांतील त्यांची विचारसरणी अत्युच्य आहे. उर्दू भाषेवर मातृभाषे इतकेच त्यांचे प्रभुत्व आहे---- आलमगीर बादशहाच्या वेळी एक ब्राह्मण शायर होते. त्यानंतर दुसरे ब्राह्मण शायर म्हणजे ''नुसरत'' (यशवंत कोरेकल) हेच होत''

या प्रकाशित ग्रंथाशिवाय कोरेकलांनी दोन उर्दू नाटके लिहिली असून ती अप्रकाशित आहेत. ही दोन्ही संगीत नाटके आहेत. त्यांची नावे ''मक्सदे ह्यात'' उर्फ इष्तियाके तआलीम'' आणि ''करिष्मे इष्क'' या दोन्ही नाटकाची हस्तलिखिते आज दुर्देवाने उपलब्ध होत नाहीत. पण कोरेकलांच्या इतर प्रकाशित ग्रंथामध्ये या नाटकाच्या ज्या जाहिराती आढळतात त्यावरून ''करिष्मे इष्क'' हे नाटक हरिनारायण आपट्यांच्या ''संगीत पिंगळा'' या नाटकाचे उर्दू रूपांतर होते असे दिसते. या नाटकाशिवाय '' आक्ताबेईरफान'' हा ग्रंथ म्हणजे ''सुधांशु'' या हिन्दी ग्रंथाचे उर्दू रूपांतर होय. आणि मुळात ''सुधांशु'' हा ग्रंथ श्रीमन् मार्तण्ड माणिक प्रभू लिखित ज्ञानमार्तण्ड या ग्रंथाचा हिन्दी अनुवाद होय. या शिवाय कोरेकलांनी अत्यंत परिश्रमपूर्वक ५०० पृष्ठ्यांचा मराठी उर्दू लघुकोश तयार केला होता. पण तोही प्रकाशित झालेला नाही व आता त्याचे हस्तलिखितही उपलब्ध होत नाही. थोडक्यात उर्दूमध्ये देखील कवी अलिम (विद्धवान) म्हणून प्रतिष्ठा पावलेले कोरेकल नाटककार, गद्यलेखक व कोशकार म्हणूनही मान्यता पावलेले आहेत. त्यांचे अप्रकाशित ग्रंथ प्रकाशित होणे अगत्याचे आहे. अनुपलब्ध ग्रंथ उपलब्ध करून देणे हे महत्वाचे. योग येईल तो सुदिन.

हिन्दीमध्ये कोरेकलांनी दोन ग्रंथ लिहिले असून त्यापैकी एक प्रकाशित व दुसरा अप्रकाशित आहे. त्या पैकी ''यशोबिम्ब'' हा काव्यग्रंथ

असून तो ही प्रकाशीत आहे. त्यांचा दुसरा ग्रंथ '' ज्ञानमार्तण्ड'' या तत्वज्ञानात्मक ग्रंथाचा हिन्दी अनुवाद''सुधांशु'' होय. हा ग्रंथ प्रकाशित असून त्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्धात कोरेकलांनी ३४ विषयाचे विवेचन केलेले असून ते कोणत्याही वेदान्त ग्रंथाच्या प्रथे प्रमाणे ''मंगलाचरणा'' पासून सुरुवात करून खंडण मंडण पद्धतीने आत्म्याचे स्वरूप, मुक्तीचे स्वरूप, इत्यादीचे विवेचन करीत सहजमुक्तीची प्रशंसा केली आहे. तसेच वेदान्त विचार सांगताना, जागृती, स्वप्न, सुषुप्ती व मृत्यु याचा उहापोह करून ब्रह्मज्ञानाचे विवेचन केलेले आहे. त्यात कोरेकलांनी ब्रह्माचे ज्ञान होत नाही, परंतु सृष्टीचे ज्ञान मिळवल्याने ब्रह्मप्राप्ती होते, कारण ब्रह्मच सृष्टीरूपाने भासमान होते, असे सांगितले आहे. त्यात शंकराचार्यांच्या ब्रह्मविषयक विवेचनाचा साधा स्वीकार केलेला दिसतो. नंतर सर्वसामान्य लोकांसाठी आत्मविद्येची अवश्यकता काय आहे याचे प्रतिपादन करून शेवटी सत् चित् आनंद याचे स्वरूप वर्णन केले आहे. ग्रंथाच्या उत्तरार्धात सकलमत संप्रदायाचे विस्तारानी विवेचन कोरेकलांनी केलेले असून, त्यात या संप्रदायाचे मुख्य दैवत श्री दत्तात्रेयाचे स्वरूप सांगितले असून दत्तात्रय हे अवस्थात्रयी जाणणारे, तिन्ही अवस्थेत रहाणारे आणि तिन्ही अवस्थांचे नियमन करणारे म्हणून ''दत्त एव अत्रेय'' या बृहद् आरण्यकोपनिषदातील व्युत्पतीचा आधार घेतला आहे.

तिसरे प्रकरण '' जडाजड विभाग विचार'' हे असून त्यात जड जगत आणि चेतन आत्मा यांच्या परस्पर संबंधाचा विस्ताराने विचार केला आहे.

चौथ्या '' त्रिपादब्रह्म विवरण'' नामक प्रकरणात ब्रह्म चतुष्पाद असून त्याच्या एकाभागात सृष्टी निर्माण होत असते, आणि उरलेले तीन भाग शक्तिरूप असतात असे विवेचन आले आहे.

इच्छा होती. आणि आहे. त्यामुळे महत्वपूर्ण हिन्दी भाषातर करून श्री यशवंतरावांनी गुरु सेवेचे महत्वाचे कार्य केलेले आहे. त्यामुळे श्री शंकर माणिक प्रभुना फार समाधान वाटले व वेदान्त विषयक वाचकांची तृप्तीही झाली हे सांगण्याची अवश्यकताच नाही ''.*

कोरेकलांनी आपल्या लिखाणाला सुरूवात जरी उर्दूतून केली असली तरी पुढे जेव्हा ते काव्य लेखनाकडे वळले तेव्हापासून त्यांनी आपले सर्वच लेखन मराठी भाषेतूनच केलेले दिसते. त्यांचे तीन काव्यग्रंथ म्हणजे '' काव्यकुसुम कलिका प्रथमउद्‌भव २ काव्यकुसुम कलिका (द्वितीयउद्‌भव) (पुष्पपाकळ्या) ३ काव्यकुसुम कलिका ( तृतीय उद्‌भव) ( सुमन सौरभ) हे प्रसिद्ध आहेत. आणि ''विचार वैभव'' ''कौस्तुभकिरण'', '' यशोविलास'' हे गद्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. पण या शिवाय काही गद्य पद्य पुस्तकांपैकी '' विरोधाभाव'' हे संगीत नाटक, काव्यकुसुम कलिका(चतुर्थोद्भव) हा काव्यग्रंथ आणि 'मराठी उर्दूकोश' हे तीन ग्रंथ अमुद्रित असून आज ते उपलब्ध नाहीत.

कोरेकलांच्या 'विचारवैभव' या ग्रंथाचे प्रकाशन २८ मार्च १९४० रोजी माणिकनगर संस्थानात झाले. यात एकूण १३ लेख आणि संस्कृतभाषेतील उपनिषदावरती लिहिलेले आहे. अद्वैताचे सर्व सिद्धांत कोरेकलांनी विस्तारांनी आणि खंडन मंडन पद्धतीने आणि सोदाहरण समजावून सांगितले आहेत. तसेच यात नेहमीच्या व्यवहारातील उदाहरणे देऊन कोरेकलांनी '' स्वप्न आणि जागृती '' चे स्वरूप अतिशय सहजपणे समजावून दिले आहे. दोन भाऊ आणि कुत्र्याची चुटकेदार गोष्ट सांगून आपल्या विवेचनात रंजकता आणली आहे. आणि त्यानंतर

* गूळ लेखन हिन्दी त्याचा मराठी अनुवाद.

समाधी या विषयाचे कोरेकलांनी विवेचन केले आहे. समाधीचे स्मरण कसे आनंददायक असते ते कल्पवृक्षाच्याखाली बसलेल्या मनुष्याच्या गोष्टीतून कोरेकलांनी रंजकतेने सांगितले आहे. 'चिद्विलासभावना' याचे विवेचन करताना कोरेकलांनी 'चित्' म्हणजे काय ते सांगून त्याची व्याप्ती सर्वत्र आणि आनंदपूर्ण असते असे म्हटलेले आहे.

'आमची झोप' या पुढील लेखात 'इहं नास्ति परं न लभ्यते' अशा स्वरूपाच्या आपल्या देशातील आजच्या अवनत अवस्थेचे कोरेकलांनी विवेचन केलेले आहे. त्याचबरोबर सर्वसामान्य माणसाची झोप आणि ब्रह्मसाक्षात्कारी सत्पुरूषांची झोप याचे ही विवेचन कोरेकलांनी माणिकप्रभुंची एक अद्‌भूत गोष्ट सांगून केले आहे. ''विचार वैभव'' या ग्रंथावर श्रीधरशास्त्री पाठक यांनी अभिप्राय दिलेला आहे. ते म्हणतात-

'' पुस्तक वाचून पाहिले. त्यावरून कर्त्याची विद्वता व विचार शालिनतापूर्ण अनुभवास आली. श्री यशवंतरावजी कोरेकल यांचे उपनिषद वाङ्मयाचे परिशिलन चांगले झाले आहे व अद्वैत सिद्धांत त्यांना मान्य असल्याने त्यांनी भगवत्पूज्यपाद श्री शंकराचार्यांच्या प्रस्थानत्रयाचेही उत्तम परिशिलन केले आहे. आमच्या दृष्टिने स्वतंत्र प्रकरणांनी लिहिलेला व अद्वैताचे सर्व सिद्धांत समजावून सांगणारा हा अपूर्व ग्रंथ आहे. हा रा. कोरेकल यांचा महाराष्ट्र जनतेवर उपकार आहे.

तर श्री कृष्णाकुमार ( सेतुमाधवराव पगडी) हे या ग्रंथासंबंधी म्हणतात, '' एकंदरीत विषयाच्या मानाने कोरेकलांनी आपले विचार शक्य तितक्या सुबोध भाषेत मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे-- विषय

अत्यंत क्लिष्ट असला तरी उदाहरणे देऊन सांगणे व गोष्टीचा आधार घेऊन रंजक करणे कोरेकलांना चांगले जमते. कोरेकलांची गंभीर, प्रौढ, ज्ञानाची तळमळ असणारी अशी वृत्ति व त्यांचे श्रद्धायुक्त अतं:करण याचे उत्तम दर्शन ''विचार वैभव'' मधून वाचकाला घडते''.

'' विचार वैभव'' मध्ये कोरेकलांनी एका विशिष्ट क्रमाने विचारांची मांडणी करून त्यांना मान्य असलेले सकळमत संप्रदायाचे तत्वज्ञान लोकांपुढे ठेवले. पण या ग्रंथात समाविष्ट न झालेले असे त्यांचे तत्वज्ञानपर तीन सुटे लेख ही उपलब्ध आहेत. हे तीन्ही लेख '' तत्वज्ञानमंदिर'' या मासिकातून वेळोवेळी प्रसिद्ध झाले आहेत. '' पुनर्जन्म'', ''जिजीविषा'' व अहम अहम्'' ची ''जागती ज्योति'' हे ते तीन लेख आहेत. कोरेकल सांगतात की देह केवळ कर्माकरिता मिळालेला नसून कैवल्य सिंहासनाची पहिली पायरी होय.

देहवासना व जिजीविषा यात फरक करून देहवासना टाकणे व जिजीविषा पत्करणे श्रेयस्कर असते, असे कोरेकल सांगतात.

कोरेकलांनी केवळ तत्वज्ञानात्मक आणि विचार गर्भ असे लेखन केलेले नसून, वाड़मयीन चर्चा करणारे तसेच ललित लेखाच्या अंगाने जाणारे असेही लेखन केलेले आहे. तसेच त्यांनी काही नाट्यछटाही लिहिलेल्या आहेत. या शिवाय त्यांनी प्रहसने ही लिहिलेली आहेत. हे सर्व लेख आणि खास करून मुलीसाठी लिहिलेली व्याख्याने तसेच दोन लेख या सर्वांचा संग्रह कोरेकलांनी आपल्या ''यशोविलास'' नामक ग्रंथात केला आहे. १८५ पृष्ठांच्या या ग्रंथाचे तीन खंडात विभाजन केलेले असून त्याचे नामकरण वाड़मयीन चर्चात्मक, मनोरंजक, आणि उमलत्या कलिका करिता'' असे केले आहे.

या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडात चार व्याख्याने व दोन लेख आहेत. त्या पैकी "उद्योगाचे दैवी भांडवल" या व्याख्यानात कोरेकलांनी श्रमाचे महत्व मुलांना समजावून सांगितले आहे. स्वतः एका बालकाची भूमिका घेऊन कोरेकलांनी या व्याख्यानात मुलांची सहज समजूत पटण्याची वृत्ती व सारखे कशात ना कशात गुंतून राहाण्याचा स्वभाव याच्यावर मोटा मार्मिक प्रकाश टाकला आहे. त्याच प्रमाणे ब्रह्मचर्याची आवश्यकता सांगणारा "ब्रह्मचर्य" हा लेख, मुलींची कर्तव्ये ज्यातून सांगितली आहेत असा "मुलींची कर्तव्ये" हा लेख व "थोरांची चरित्रे" ही इतर तीन व्याख्याने कोरेकलांनी मुलांसाठी लिहिलेली दिसतात. ही व्याख्याने लिहिण्यामागे कोरेकलांचा हेतू हा दिसतो की मुला-मुलींना वक्तृत्वाची सवय लागावी. ही व्याख्याने कोरेकलांनी जाहीरपणे दिलेली नसून, मुलांनी सभेमध्ये म्हणावीत म्हणून लिहिलेली आहेत. वक्तृत्व ही कला, समाजात तिची अवश्यकता आणि तरुण मुला-मुलींनी ती आत्मसात करावी म्हणून कोरेकलांना वाटणारी तळमळ या चारही लेखांतून चांगली व्यक्त होते. कोरेकल हे उत्तम वक्ते होते हे त्यांच्या पुणे-नाशिक येथील वसंत व्याख्यानमालेतील व्याख्यानावरून दिसून येते. कोरेकल जसे जिज्ञासूना संगीत शिकवीत तसेच आपल्या जवळ असलेली ही वक्तृत्वकला ही इतरांना शिकवावी अशी त्यांची इच्छा या लेखातून दिसते. हैदराबादेत त्यांना सर्वसामान्यपणे "गुरुजी" संबोधण्यात येई याचा उल्लेख वर आलेलाच आहे. त्यांच्या या वाङ्मयीन लेखांमधूनही त्यांचे अध्यापकीय व्यक्तित्व उत्तमपणे व्यक्त होते. याच ग्रंथातील "स्वच्छता" हा लेखही वरील चार लेखासारखाच आहे. फक्त तो व्याख्यान स्वरूपात नसून लेख या स्वरूपात आहे. हाताची स्वच्छता एवढा एकच मुद्दा कोरेकलांनी त्यातून सोदाहरण मांडला आहे.

कोरेकलांचा आणखी एक स्फुट लेख म्हणजे " हा आमचा भक्त कार्यकल्पद्रुम" आपले गुरु श्री मार्तण्ड माणिकप्रभू यांच्या अध्यात्मिक व्यक्तित्वाचा कोरेकलांनी या लेखात भक्तिपूर्ण परिचय करून दिला आहे. आणि तो करून देतानाच सकलमत संप्रदायाचे सारही सांगितले आहे.

"परोपकारी प्रकार" हे ही तीन प्रवेश असलेले प्रहसन आहे. यात इंग्रजीच्या अतिरेकी प्रभावाखाली आलेल्या हिन्दू व्यक्तिची खिल्ली कोरेकलांनी उडवलेली आहे. पण त्याचबरोबर शिक्षणाचे महत्वही सांगितले आहे. "धर्मरूढीबंधन" हे एक प्रवेशी प्रहसन. त्यात जाती पातीचा फोलपणा आणि कालबाह्य झालेल्या रूढी यांच्यावर कोरेकलांनी कोरडे ओढले आहेत आणि त्यत एक विडंबन गीत ही कोरेकलांनी टाकले आहे.

"वेडा", विक्षिप्त आणि " वेडा का शहाणा", या तीन नाट्यछटा आहेत. त्यात व्यायामाचे वेड घेतलेला, सत्याग्रहाचे वेड घेतलेला, आणि सर्वांनी वेडा ठरवलेला एक अल्लड मुलगा यांची व्यक्तिचित्रे नोंदवली आहेत.

याशिवाय "संगीत सौभद्र समालोचन", साहित्य वाङ्मय- विविध-विचार" आणि "वाङ्मयतम" हे वाङ्मयाच्या विविध पैलूंची चर्चा करणारे लेख कोरेकलांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्वावर उत्तम प्रकाश टाकणारे आहेत. त्यापैकी "संगीतसौभद्र समालोचन" हा ३८ छापील पृष्ठांचा प्रदीर्घ लेख असून तो कोरेकलांनी किर्लोस्कर सप्ताह अभिनव शारदोपासक मंडळाने १९३६ साली पुण्यात साजरा केला होता त्या साठी लिहिला गेला होता. हा लेख या कार्यक्रमात जाहीरपणे वाचला गेला. त्या संबंधी श्री. नी. चापेकर यांनी कोरेकलांना पत्र पाठवून कळविले होते -

" कार्यक्रमात लिहिल्याप्रमाणे रविवारी सकाळीच आपला निबंध वाचण्यात आला. तो एकंदर श्रोतृ समाजास फारच मार्मिक विद्वतापूर्ण, रसिकतायुक्त असा वाटला व त्याच्या श्रवणाने सर्वांस फार आल्हाद वाटला. हे कळविण्यास अत्यंत संतोष व आनंद वाटत आहे. असा सुंदर निबंध धाडल्याबद्दल जाहिररीत्या "मंडळा" तर्फे आभार व्यक्त करण्यात आले ".

कोरेकलांनी या लेखात नाट्यलेखनातील किर्लोस्करांचे लोकोत्तर कार्य, नाट्यकलेचे महत्व, नाटकातील संगीत व गायनाचे महत्व आणि गायनातील राग व रसांचा परस्पर संबंध अशा काही अनुषंगिक गोष्टीची चर्चा करून त्या पार्श्वभूमीवर "संगीत सौभद्र" च्या पदांची मोठी मार्मिक समीक्षा केलेली आहे. त्या नंतर अंकशः पहाणी करून त्या त्या अंकातील पदे व ती ज्या रागात बांधली आहे त्या रागाचा कोरेकलांनी विस्ताराने विचार केलेला आहे.

" साहित्य " या दुसऱ्या लेखात विशेष करून काव्य प्रकाराची चर्चा केलेली आहे. त्यातही वृत्त, छंद इत्यादी कोरेकलांच्या आवडीच्या विषयावर भर असून शेवटी शब्द आणि शब्दशुद्धी यांचा थोडासा विचार केलेला आहे. वर्णाच्या शुद्ध उच्चारासाठी विशिष्ट वर्णाच्या विशिष्ट उच्चाराचा निर्देश व्हावा म्हणून त्या वर्णाखाली अनुस्वार देण्याची सूचना कोरेकलांनी सन् १९३१ सालीच केली होती. मराठातील "च" वर्गातील वर्णासंबंधी आज ही सूचना अधून मधून होत असते. कारण विशेषतः 'च' आणि 'ज' यांचे मराठीत दोन प्रकारचे उच्चार होत असताना सुमारे ६५ वर्षापूर्वीच कोरोकलांनी ही सूचना केलेली असावी यावरून त्यांची दूर दृष्टी आपणास दिसून येते.

कोरेकलांनी ''वाड़मय विविधविचार'' या लेखात वाङ्मयाची एकात्मता, ती साधण्यास वाङ्मयाचा प्रसार, त्यासाठी मुद्रणालयाची वाढ, विविध भाषांच्या अभिवृद्धीसाठी नियतकालिकांची आवश्यकता याचा त्यांनी विचार केलेला आहे. कोरेकलांनी मासिका संबंधी मांडलेले विचार आजही मौलिक वाटतील असे आहेत. वाङ्मयाच्या वाढीसाठी कोरेकल पाच सूचना देतात त्या अलंकाराचे महत्व, प्रौढगंभीर निर्मिती, अध्यात्मापर कवितेला काव्य म्हणून स्थान मिळावे आणि उत्तान शृंगार पर आणि अतिशृंगारपर काव्य अश्लील ठरवावे व वाईटग्रंथ निर्माण न होतील याची काळजी घ्यावी अशा दोन सूचनाही त्यांनी दिलेल्या आहेत.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्या प्रमाणे-

'' वाचे बरवे कवित्व । कवित्वी बरवे रसिकत्व

रसिकत्वी परतत्व । स्पर्शु जैसा ।''

हे मत कोरेकलांनाही मान्य होते. म्हणूनच अध्यात्मपर काव्याला श्रेष्ठ वाङ्मयाचा दर्जा दिला पाहिजे अशी मागणी त्यांनी केली आहे. '' विचार वैभव'' आणि ''यशोविलास'' या दोन्ही ग्रंथातून कोरेकलांनी वैचारिक वाङ्मयाची मांडणी केलेली आहे. तसेच ललित वाड़मयही कोरेकलांनी लिहिलेले आहे. त्यांच्या '' कौस्तुभकिरण'' या ग्रंथात चार लघुकथा व बारा ललित निबंध आहेत.

''हवापाणी'', ''हलवा आणि पाजवा'',''शिर्रर'', व ''गोष्टीची गोष्ट'' या चार लघुकथा कोरेकलांनी लिहिलेल्या आहेत. मनोरंजनाला प्राधान्य देणारा लघुकथा हा वाङ्मयप्रकार हाताळतानाही कोरेकलांच्या लेखणीतून अधूनमधून तत्वज्ञानाचा प्रवाह वाहात असलेला दिसतो.

''हलवा आणि पाजवा'' या कथेत अधुनिक डॉक्टरांची जुन्या वैद्याशी तुलना त्यांनी केली आहे. हलवा व पाजवा याचा अर्थ बाटली ऐवजी रूग्णाला खूप हालवावे असा विनोद त्यांनी केलेला आहे आणि बाटली वरील '' शेक दी बॉटल'' याचा अर्थ बाटलीला शेकणे असा घेऊन आणखी विनोद कोरेकलांनी केलेला आहे.

''शिर्रर्र'' या गोष्टीत गाडीतील गर्दी आणि त्या धांदलीत जिचे बाळ बाहेरच राहून गेले होते अशा आईची गोष्ट ते सांगतात. गाडी सुरु होण्याच्या शिर्रर्र या शिट्टीचा आणि त्या बाईला लागलेल्या वेडाचा मोठा चांगला संबंध कोरेकलांनी या गोष्टीतून जुळवून दाखविला आहे.

लघुनिबंधातून प्रगट होणारे कोरेकलांचे व्यक्तित्व कथाकार कोरेकलांपेक्षा फारच वेगळे आहे. तुरंग, कुरंग, मातंग, पतंग, भृंग, ही त्यांच्या कांही लघुनिबंधाची शीर्षके पाहिली तर कोरेकलांची प्रासाची आवड सहज लक्षात येते. '' काचः काचो मणिर्मणिः '' या निबंधात ते काचेचे गुणधर्म उदाहरणासह सांगतात तर '' तुरंग'' या निबंधात घोडा आणि घोड्याशी संबंधीत मराठी वाक्प्राचार याचा कोरेकलांनी विनोदी पद्धतीने उपयोग करून आपला निबंध सजवला आहे. '' अर्थाचा अनर्थ'' निबंध शब्दाचे भलतेच अर्थ करणाऱ्या लोकांवर कोरडे ओढणारा आहे. त्यात विशेषकरून कीर्तनकार बुवा कसे वाटेल ते ठोकून देतात, यावर कोरेकलांनी भर दिलेला आहे. तसेच ''वादवैय्यर्थ'' या निबंधात विनाकारण कोणत्याही गोष्टीवर वाद घालत बसण्याच्या वृत्तीवर ते टीका करतात. '' काटा '' या लघुनिबंधात काटा या शब्दावर नाना प्रकारच्या कोट्या करीत त्यांचे विविध अर्थ त्यांनी दिलेले आहेत. '' अध्याहृत'' या शेवटच्या निबंधात स्पष्टपणे न सांगता समजून घेण्याच्या गोष्टी

निरनिराळ्या उदाहरणांनी कोरेकल समजावून सांगतात. त्यांच्या निबंधाबाबत कृष्णकुमार (सेतू माधवराव पगडी) म्हणतात "कोरेकलांच्या निबंधातून सात्विकपणा प्रतीत होतो. निरीक्षणाने जे सुचले ते शांतपणे व स्पष्टपणे लिहायचे. त्यांचे निबंध वाचताना नंदादीप शांतपणे जळत असलेल्या खोलीत गेल्याचा भास होतो व एक तपस्वी व विचारवंत व्यक्तीशी हळू हळू आवाजात बोलतो आहोत असे वाटते."

गद्यलेखनातून साकार होणाऱ्या कोरेकलांच्या या व्यक्तित्वाचा "ध्वनी" त्यांच्या काव्यातही आढळून येतो. कोरेकलांची मूळ वृत्ती काव्यलेखनाचीच. कोरेकलांना 'कवी' म्हणूनच खूप प्रसिद्धी मिळाली आहे.

कोरेकलांचे एकूण तीन कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. १९३३ साली "काव्य कुसुम कलिका" (प्रथम उद्भव) प्रसिद्ध झाला. त्यात ७५ कविता आहेत. १९३४ साली ( काव्य कुसुम कलिका) या काव्यसंग्रहाचा द्वितीय उद्भव 'पुष्पपाकळ्या' या नावाने प्रसिद्ध झाला. पहिल्या संग्रहातील कुसुमकलिका उमलून त्याच्या पाकळ्या विलग झाल्या आहेत. म्हणजे कवीच्या कवित्वशक्तीचा विकास झाला आहे. यात एकूण २३६ कविता आहेत. या काव्य संग्रहाचे वैशिष्ठ्य असे की, यात कोरेकलांनी विविधवृत्तामध्ये जाणीवपूर्वक काव्य रचना केलेली आहे. त्यात एक अक्षरी "श्री" वृत्तापासून तो तीस अक्षरी " अर्जदंडक" पर्यंत एकूण २३६ वृत्ते नावानिशीवर व लक्षणांसहित देऊन त्या त्या वृत्तात कविता केल्या आहेत. त्यात संस्कृत अक्षरवृत्ते, गणवृत्ते, समवृत्ते, अर्धसमवृत्ते, विषमवृत्ते, मात्रागणवृत्ते आणि प्राकृतवृत्ते अशा सर्व वृत्तांचा समावेश आहे. शेवटी परिशिष्टात त्याची सूचीही कोरेकलांनी दिलेली आहे.

यावरून कोरेकलांच्या दीर्घोद्योगाची व अभ्यासू वृत्तीची कल्पना येऊ शकते. या ग्रंथाला वाई रंगाचार्य रेड्डी शास्त्री यांची अत्यंत विद्वत्तापूर्ण व विवेचक प्रस्तावना लाभली आहे.

कोरेकलांच्या कवितांचा तिसरा संग्रह ''सुमन सौरभ'' या नावाने १९३६ साली प्रकाशित झाला. पहिल्या संग्रहातील कलिकांचे दुसऱ्या संग्रहात पुष्पपाकळ्यात रुपांतर झाले आणि तिसऱ्यांत त्याचा सुगंध चहू दिशांना पसरला. यात विविधवृत्त व विषय या वरील ३०० कविता समाविष्ट आहेत आणि ग्रंथाच्या शेवटी छापलेल्या ''अपूर्ण'' या शब्दावरून चौथा संग्रह छापण्याच्या 'मनोगत' वरून कोरेकलांच्या आणखी बऱ्याच कविता मागे उरल्या असाव्यात असे म्हणता येते. त्यांच्या तीन संग्रहात ६११ कविता प्रकाशित आहेत.

कोरेकलांची बहुतेक कविता वृत्तात आहे. चालीवर रचलेल्या काही कविता दिसत असल्या तरी वृत्तनिष्ठता हे त्यांच्या कवितेचे मुख्य वैशिष्ठय आहे. ''पुष्पपाकळ्या'' या द्वितीय उद्भवातील कवितांची रचना केवळ वृत्तांची उदाहरणे देण्यासाठीच झाली आहे हे लक्षात घेतले म्हणजे त्यांच्या वृत्तनिष्ठेबद्दल संशय रहात नाही. कोरेकल स्वतः संगीततज्ञ होते. त्यामुळे काही ठिकाणी छंद व रागांचाही उल्लेख केलेला आहे. मुख्यतः त्यांची वृत्ती तत्वज्ञानप्रधान असल्यामुळे व त्यासाठी संस्कृतातील दर्शनशास्त्राचे भरपूर वाचन केलेले असल्यामुळे त्याचा परिणाम त्यांच्या लेखनशैलीवर झालेला आहे. कोरेकलांनी उर्दुतून शिक्षण घेतलेले असल्याने त्या भाषेचाही प्रभाव त्यांच्यावर कायम आहे. पण तो शब्दात दिसण्यापेक्षा अनुप्रासात्मक रचनेत ज्यास्त दिसतो. प्रासात्मक रचना ही उर्दू शायरीतून त्यांना मिळालेली देणगी आहे. कोरेकलांच्या या ज्या सहाशेवर कविता आहेत.

त्यांच्यात जशी वृत्तांची विविधता आहे, तशीच विषयांचीही विविधता आढळून येते. दीर्घ चिंतनातून आणि मननातून त्यांच्या अंतःकरणात साहित्य विषयक काही विचार सिद्ध झाले होते, त्यांचा परामर्श त्यांनी कवितातून घेतला आहे.

कोरेकल हे गद्य आणि पद्य दोन्ही प्रकारच्या वाङ्मयात सहज विहार करू शकतात. गद्य वाङ्मयात तत्वज्ञानपर लेख, समीक्षात्मक व आस्वादात्मक लेख, या सोबतच कथा, लघुनिबंध हेही वाङ्मय प्रकार कोरेकलांनी हाताळलेले आहेत. कोरेकलांची नाटके अप्रकाशित आहेत पण प्रहसने व नाट्यछटा प्रकाशित आहेत. या वरून त्यांनी नाटक हाही वाङ्मय प्रकार हाताळलेला दिसतो. या सर्व गद्य लेखनात कथा आणि नाटक या वाङ्मय प्रकारात कोरेकल रमू शकले नाहीत. एवढ्यामोठ्या प्रमाणावर काव्यरचना करूनही आणि स्वतः कीर्तनकार असल्यामूळे त्या निमित्ताने विविध आख्यानांची त्यांनी रचना केलेली असूनही कोरेकलांनी खंडकाव्य किंवा महाकाव्य लिहिलेले नाही. याचे कारण कोरेकल हे तर्क पद्धतीने लिखाण करणारे साहित्यिक होते. त्यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्वावर तर्क-प्रधानता व बुद्धिमत्ता याचा प्रभाव मोठ्या प्रमाणात दिसतो.

कोरेकलांच्या काव्यरचनेत अनेक विषय आलेले आहेत. किंबहुना गद्य लेखकापेक्षा कवी म्हणून त्यांना अधिक प्रसिद्धी आणि लोकप्रियता लाभली आहे. कोरेकल हे प्राचीन मराठी संतकवी व आधुनिक मराठी भावकवी या दोघांच्या सीमा रेषेवर उभे आहेत. महाराष्ट्राच्या बाहेर राहूनही आपल्या काव्याद्वारे त्यांनी मराठीची जी निरलस सेवा केली, विशेषतः ''पुष्पपाकळ्या'' या काव्यसंग्रहातून वृत्त रचनेचे जे सोदाहरण प्रात्यक्षिक

त्यांनी दाखविले त्यामुळे महाराष्ट्र शारदेच्या दरबारात कवी कोरेकलांना महत्वाचे स्थान आहे.

कोरेकलांचा मूळ पिंड अध्यात्म प्रवण आहे. त्यामुळे त्यांच्या सर्व कवितांना अध्यात्माचा स्पर्श कोणत्या ना कोणत्या स्वरूपात झालेला दिसून येतो. कोरेकल हे त्यांचे गुरू मार्तंड माणिकप्रभू यांना अन्यन्यभावे शरण गेले होते. या गुरूभक्तितूनच त्यांनी आपले सर्व काव्य माणिकप्रभूंच्या चरणी अर्पण केले होते. मातृभाषेचा अभिमान त्यांच्या काव्यातून ठिकठिकाणी प्रकट होतो. त्यांच्यावर संतवाङ्मयाचे संस्कार होते त्यातूनच त्यांना संतवाङ्मयाचीही ओढ लागलेली दिसते. ज्ञानेश्वरापासून रामदासांपर्यंत प्रत्येक कवीने '' ईश्वरगुणवर्णन'' हे आपल्या काव्याचे मुख्य प्रयोजन मानलेले आहे. संतकवीकडून आधुनिक कवीकडे वळलो तर तिथेही '' आनंद'' हेच मुख्य प्रयोजन दिसते.

कोरेकलांच्या समग्रकवितांमध्ये कवी आणि काव्यविषयक २५ कविता आहेत. '' स्वात्मानंदासाठी गावे'' असे जरी कोरेकल म्हणत असले तरी तो स्वात्मानंद हा ''चित्सद्आनंद'' आहे. आणि या आनंदासाठी गाणे गात असताना '' त्रासदभवप्रवास'' सहज संपून जातो. '' स्तवार्थ तुझीया तुझ्यासम कवी कधी जन्मती'' असा प्रश्न करून ईश्वराचे स्तवन करण्यासाठी कवीश्वर जन्माला यावयास हवा असे कोरेकलांनी म्हटलेले आहे. मात्र कोरेकलांच्या काव्यसंग्रहाच्या ' अर्पण पत्रिका'' पाहिल्या तर आपला ईश्वर ते '' श्री मन्मार्तण्डमाणिकप्रभु'' यांना मानत होते असे दिसते. कारण त्यांच्या मृत्युनंतर कोरेकलांनी जी '' आदरांजली'' वाहिली आहे त्यात माणिकप्रभूंना उद्देशून ते म्हणतात

''तुझ्या चरण चिंताविण नको दुज्या चिंतना''

त्याच कवितेत माणिकप्रभूंचे आपल्या जीवनातील स्थान सांगताना कोरेकल म्हणतात-

> " जरी उदरि जन्मलो जननि पाहिली ना मुळी ।
> तसाच जनका, तरी स्मृति तुम्ही न येऊ दिली ।।
> प्रभू ! गुरू, सहृद, सखा, भगिनी, बंधु, माता पिता ।
> तुम्हीच मज ठेविला तव न आप्तइष्टे रिता ।।

यावरून कोरेकलांच्या काव्यामागील मुख्य प्रयोजन ईश्वरभक्ती, अध्यात्म, मोक्ष आणि आपले गुरू मार्तंड माणिकप्रभू यांच्या कृपाशीर्वादाची आकांक्षा व "स्वात्मानंदा" साठी गावे हेच प्रयोजन दिसते.

कोरेकल आपल्या कवितेत कारण म्हणून ईश्वर, शारदा आणि प्रतिभा, तसेच शब्दार्थ आणि अलंकार इत्यादी गोष्टी मानतात. उदाहरणार्थ "सगुण घोषणा- निर्गुणी" या कवितेत ते म्हणतात.

> " तुझे तरिच नाम ही मम मुखे सुखे घेववी ।
> तयात रस योजुनी मज मुदे, मदे नाचवी
> असे स्वसुख चाखवी विसरवी जगाची चवी ।"

तसेच शारदागायन या कवितेत कोरेकल सांगतात

> " कितीही कवीसही जगवि शारदा-मुग्धता"

या शारदेच्या प्रसादाने काव्य रचले जात असते. ईश्वराची आणि शारदेची कृपा नसेल तर काव्यच नाही असे कोरेकल म्हणतात. आपली कविता ईश्वरप्रेरणेनेच निर्माण झालेली असल्यामुळे कोरेकलांना ती ईश्वरालाच अर्पण करणे इष्ट वाटते. म्हणूनच ते म्हणतात-

" या दीनाची ही वाक्सेवा प्रभुवर परतर सुखकर देवा घ्यावो"

कविता श्रेष्ठ कशामुळे होते याची कारणे सांगताना, नवनव्या कल्पना, प्रासादिक शब्दसौष्ठव, शब्दालंकृती, इत्यादीचे महत्व सांगून अलंकराबद्दल आपल्या " कवीची बैठक" या कवितेत कोरेकल म्हणतात-

"योजोनी उपमा, प्रमेयरस वाक्लृप्ती अंलकार हा ।

तैसे रूपक वा प्रसाद यमका प्रासादि योजी अहा ॥

ज्याची सुंदर गोड, रम्य कविता आल्हाद देई मना ।

सौंदर्ये रसिकास थक्क करूनी जी लोभवी सज्जना ॥

अशी अलंकाराची अपरिहार्यता कोरेकल सांगतात. कविते विषयी कोरेकलांनी केलेली ही विधाने पाहू जाता आपणास आणखी असे दिसते की,

" गदीयकविता" असो म्हणू तरी करो काय ते ।

सुशब्द मधुवाक्य जे सकळही स्वयंसिद्ध ते ॥

मदीय म्हणु योजना तरीही वृत्त वा छंद ते ।

अधीच ठरले असे नियम सर्व सर्वामते ॥

या ओळीतून शब्द, वृत्त यांचे महत्व कोरेकलांना किती वाटत होते हे स्पष्ट दिसून येते.

त्यांच्या द्वितीय उद्भवातील सर्व कविता त्यांनी निरनिराळ्या वृत्तांची रचना करण्यासाठीच लिहिल्या आहेत. पण या सर्वापेक्षाही त्यांना

त्यांचे सद्गुरू माणिकप्रभू यांच्या कृपाप्रसादानेच काव्य होते असे सांगण्याचा अभिमान वाटतो. त्यांच्या विषयी कोरेकल म्हणतात,

" निमित्तमात्र वाणीकडून बोबडे बोल वदवून कौतुक करणारे " मार्तंड माणिकप्रभूच आहेत, आणि त्यामुळे आपले तीनही कविता संग्रह त्यांनी मार्तंड माणिकप्रभूनाच अर्पण केलेले आहेत. तेव्हा सद्गुरुकृपाच त्यांना आपल्या काव्याचे आदिकारण वाटत होते हे उघड आहे. सद्गुरूकृपा हीच ईश्वरकृपा होय. या कृपेनेच शारदा प्रसन्न होते. तिच्या प्रसादाने प्रतिभेची प्राप्ती होते. आणि प्रतिभेच्या बळावर काव्य होते. अशी काव्यकारण परंपरा कोरेकल मानतात. स्वतःच्या भावनांना उद्गार देणे हे जसे त्यांच्या कवितेमागचे प्रयोजन नाही तसेच केवळ स्वतःच्या भावना आळवून सांगणे हे त्यांच्या कवितेमागचे कारणही नाही. त्यामुळे काही बाबतीत कोरेकल आधुनिक कवी पेक्षा संतपंडिताच्या कवी परंपरेत बसणारे कवी आहेत. म्हणूनच केशवसुतांसारखा " आम्ही कोण म्हणू न काय पुसता " असा प्रश्न ते कधी विचारत नाहीत. कारण आपण काही वेगळे करीत आहोत असे कोरेकलांना वाटत नाही. मात्र ज्ञानेश्वर, नामदेवापासून सुरू झालेल्या एका महान कविपरंपरेतीलच आपण एक छोटासा दुवा आहोत, हे कोरेकल जाणून आहेत.

आधुनिक मराठी कवितेचें युग ज्यांच्यापासून सुरू झाले त्या केशवसुतादी कवीप्रमाणे कोरेकलांचा पिंड रोमँटिसिझमला जवळचा नाही. त्यामुळे अपरिहार्यपणे येणारे गूढगुंजन त्यांच्या कवितेत फारसे आढळत नाही. पण अध्यात्माची जी मूलभूत ओढ त्यांच्या व्यक्तिमत्वात आहे त्यामुळे गूढगुंजनातील आपल्याच धुंदित रममान होण्याची इच्छा व अज्ञाताची ओढ ह्या गोष्टी मात्र त्यांच्या काव्यात आढळतात.

कोरेकलांच्या एकूण कवितेत या अध्यात्मपर कवितांची संख्या सहाजिकच फार मोठी आहे. त्यांच्या प्रकाशित एकूण ६११ कवितांपैकी जवळपास दोन तृतीयांश कविता अध्यात्म वा भक्तिपर आहेत.

या कवितांची साकल्याने पहाणी केली तर त्यामधून अध्यात्म विचारांशी संबंधीत अशा विविध विषयांचा उहापोह झालेला दिसतो. हे तत्वज्ञान अर्थातच भारतीय तत्वज्ञान आहे. पण भारतीय तत्वज्ञानातही नानाविध पंथ, संप्रदाय आणि उपपंथ आढळतात, कोरेकल '' सकलमत संप्रदाय'' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या संप्रदायाचे अनुयायी होते.

'' सकलमत'' संप्रदाय हा नावाप्रमाणेच सर्व मतमतांतराचा समन्वय साधणारा संप्रदाय आहे. यानुसार सर्व धर्म आणि संप्रदाय हे परमेश्वर प्राप्तीसाठीच झटणारे आहेत. त्यामुळे कोणत्याही एकाच देवतेची उपासना केली पाहिजे असा आग्रह या संप्रदायात धरला जात नाही. मात्र सूक्ष्मपणे पहाणी केली तर वरवर सर्वव्यापी वाटणारा हा संप्रदाय अद्वैतवादी आहे हे लक्षात येते. कारण यात मुख्य देवता आत्मदेव किंवा चैतन्यदेव मानली जाते. या संप्रदायाच्या उपासना मार्गात असे मानले जाते की आत्मा हा '' स्वार्थ'' आहे येथे स्वार्थ याचा अर्थ 'सर्वाकर्षक' किंवा 'सर्वभोक्ता' असा आहे.

जड पदार्थ 'पदार्थ' आहेत म्हणजे आत्म्यासाठी आहेत. त्यामुळे आत्मा हा एकमेवाद्वितीय व अद्वय आहे. या संप्रदायाच्या मुख्य देवतेचे नाव 'आत्मदेव' किंवा 'चैतन्यदेव' आहे. तोच आत्मा किंवा सर्वात्मा किंवा परब्रह्म या अध्यात्मिक नावाने ओळखला जातो. हा संप्रदाय श्री माणिकप्रभुंना आपली आदिदैविक देवता मानतो आणि माणिकप्रभू हे दत्तात्रेयांचे चौथे

अवतार होत. अशी त्या धारणा होय. दत्तात्रेयाची आदिशक्ती श्री मधुमती असून हे बाह्यविश्व म्हणजे तिच्या मायेचेच सर्व खेळ होत असे हा संप्रदाय मानतो. या संप्रदायात इतरत्र वर्णिलेल्या सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता या चतुर्विध मुक्तीला महत्व नसून विशेष प्रतिष्ठा मिळालेली आढळते. या संप्रदायाच्या उपासकांनी श्री माणिकप्रभूंची भक्ती करावी वेदान्त सिद्धांताच्या गोष्टी कराव्यात. सदैव ज्ञान विचारणा करीत रहावे आणि मुख्य म्हणजे धारणेचा अभ्यास करावा. या क्रमाने उपासना केल्यास धारणेच्या शेवटी 'नर का नारायण' होतो हे म्हणणे तात्काळ अनुभवास येते असे हा संप्रदाय सांगतो.

कोणत्याही एकाच देवतेचा मंत्र जरी या संप्रदायात सांगितलेला नसला तरी '' भक्तकार्यकल्पद्रुम गुरूसार्वभौम श्रीमद्राजदिपराज योगि महाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकळ मतस्थापित सद्गुरु माणिकप्रभू महाराज की जय '' हा महामंत्र सांप्रदायिकासाठी सांगितलेला आहे. तसेच माणिकप्रभूंच्या भक्तीसाठी प्रातःकाळी ''श्री माणिक जय माणिक'' या ओव्या म्हणाव्यात असेही सांगितले. सांप्रदायिकासाठी सर्व कर्मे श्री माणिकार्पण ही आमुची प्रतिज्ञा आहे. या शिवाय होम हवनादिकांचे विधान, भजन कीर्तनादी उपासना पद्धती इत्यादी अनेक प्रकारे सांप्रदायाचे उपदेश व उपासना सांगितलेल्या आहेत.

इतर संप्रदाय जसे मोक्षासाठी किंवा ज्ञानभक्तीसाठी मुमुक्षुच्या ठिकाणी काही विशेष साधन संपत्ती असली पाहिजे असा आग्रह धरतात तसे या संप्रदायाचे नाही. म्हणजेच या संप्रदायात कोणाही सामान्य माणसाला देखील उपदेश घेऊन मोक्षाच्या वाटेने जाता येण्याची सोय आहे.

सकळमतसंप्रदाय हा सर्वसमावेशक आहे. त्यातील तत्वेही प्रत्येक संप्रदायातून उचलेली असल्यामुळे कुठल्याही एका परंपरेमध्ये हा संप्रदाय बसत, नाही. गुलबर्गा, बिदर या परिसरात "खाजा बंदेनवाज गेसूदराज" हा पहिला सूफी संत होऊन गेला. त्याचा दर्गा गुलबर्गा येथे असून सूफी संप्रदायाचा त्या काळी हिरीरीने प्रचार या खांजाबंदेनवाज व त्यांच्या शिष्याने केला. या प्रचारासाठी इस्लामी राजवट त्यांना सहाय्यभूत ठरली आणि सूफी तत्वज्ञानाचा प्रचार मोठ्या प्रमाणात झाला.

श्री संतमाणिक प्रभूंनी सकळमताचे संस्थापन करताना इस्लामी तत्वांचा जसा विचार केला, तसेच सुफी संप्रदायाचीही तत्वे स्वीकारली आणि त्यामुळे इतर धर्मियाबरोबरच इस्लामी धर्मी संत, भक्तही सकळमत संप्रदायाकडे वळले. माणिकप्रभूंच्या शिष्यात मुसलमानी शिष्यांचाही प्रादुर्भाव दिसतो. मुसलमान सुफी तत्वज्ञानाशी थोडा फटकून वागत असल्यामुळे व सुफी तत्वज्ञान त्यांना पूर्णपणे मान्य नसल्यामुळे कालांतराने मुसलमान शिष्य दुरावत गेले. आज सकळमत संप्रदायात मुसलमान शिष्य क्वचितच आढळतात.

श्री यशवंत कोरेकल हे माणिक प्रभूंचे निष्ठावंत शिष्य असल्यामुळे त्यांनी सकळमत संप्रदाय अंगीकृत केला पण त्यात ते पूर्णपणे रमू शकले नाहीत. त्यांच्या विचारांची बैठक ही वैदिक असल्यामुळे वैदिक तत्वज्ञान त्यांच्यात पूर्णपणे मुरलेले होते. त्यातही अद्वैत तत्वज्ञानाची ओढ असल्यामुळे त्यांच्या काव्यातून पूर्णपणे अद्वैत तत्वज्ञानाचे प्रतिबिंब दिसून येते आणि सूफी तत्वज्ञानाचा प्रत्यय मात्र त्यांच्या काव्यातून कोठेही आढळत नाही. कोरेकल हे माणिकप्रभूंच्या नातेसंबंधात होते, त्यामुळे सहाजिकच त्यांचा ओढा माणिकप्रभूंकडे व त्यांच्या सकलमत संप्रदायाकडे अधिक होता.

कोरेकलांच्या कवितामधून, अद्वैतविचार मोठ्या प्रमाणात आला आहे. त्यात परब्रह्म, आत्मा, पूर्णत्व, जीवशिवात्मकता आणि सच्चिदानंद स्वरूप इत्यादी गोष्टीचा विचार येतो.

या नश्वरजगात जन्माला आलेल्या जीवाला हे जग आभासमय आहे, हे पटवून देणे हीच गोष्ट फार कठीण आहे. आणि आत्म्याचे एकत्व सांगावयाचे तर बाह्यविश्वाचे आभासत्व आधी पटविता आले पाहिजे. ते पटवून देण्यासाठी कोरेकल ' होणार ते होऊ दे' या कवितेत सांगतात-

'' येथे नाहीच काही शाश्वत असे, दृष्टीत जे मावते''

त्यामुळे कोरेकल या जन्माला आलेल्या जीवाला समजावतात,

'' आहे एकचि जन्मसिद्ध तव हे स्वानंद साम्राज्य रे ''

या स्वानंदात तरी स्थिर व्हावे म्हणजे हळू हळू शाश्वत आत्म्याकडे जाण्याचा मार्ग दिसू लागतो असे कोरेकल सुचवितात. या जगात जन्माला आलेला जीव हे जगच खरे मानतो. पण जेव्हा स्वतःच्या सामर्थ्याची म्हणजेच आत्म्यैक्याची खात्री पटते तेव्हा काय वाटते हे सांगताना कोरेकल म्हणतात.

''होतो जगद्रूप तेव्हा जगाते मनी जाणतो, सांगतोही मुखे ।
जाणे तरी मी मला निश्चयाने, मदीयत्व मी मात्र सांगू शके ।
माझ्या स्वरूपा न कोणीच जाणे, असे अद्वैक्यचिंत्य अदृष्ट ते ।
सामर्थ्य माझे मला पूर्ण ठावे, म्हणा जे मना काय मानेल ते ॥

परब्रह्मचा शोध घेऊन त्याच्याशी असलेले अद्वैत जो जाणतो तोच पूर्ण पुरुष होय आणि

'' असा पूर्ण जो त्यास येणे न जाणे ''

अशी त्यांची अवस्था होते असे कोरेकल सांगतात "मुमुक्षुबाळाचा पाळणा" गाताना देखील कोरेकलांनी जन्मला आलेल्या जीवाला उद्देशून म्हटले आहे-

" दृष्यडोही या बुडालाशी । व्यर्थ कीरे श्रमलाशी "

" तत् त्वं असि तत्वमसि" । ब्रह्म, आत्म, परब्रह्म, परमात्म हे सगळे एकच आहेत. त्यामुळेच "कोण जो साधि एकाते ? " " साधित स्थिती सिद्धती" असा जवळचा मार्ग कोरेकल सांगतात. हे जे "एक" आहे ते कसे " शुद्धविराट" आहे त्याचे वर्णन " शुद्धविराट" या कवितते कोरेकलांनी केलेले आहे. ते म्हणतात-

" डोळे जे जगतात पाहती सारे बाह्यचि व्यर्थ मनिले ।

वैचित्र्यांच भुलोनि हर्षसी त्यांनी शुद्ध विराट पाहिले "

किंवा

" कोठे विष्णूस्वरूपी दिससी तरि कधी श्री महादेवरुपी

जैशी गंगा म्हणावी लघुजरिसरिता, कूपते ज्ञानवापी

तैसे नानामिषे तू प्रभूवरा । वसशी एकला सर्वजागी

सर्वव्यापी असा तू जरी तरि न उमजती तेच मोठे अभागी " ।

आत्म्याचे एकत्व सांगताना कोरेकल म्हणतात-

" आत्मा तोच अखंड पूर्ण भरला, मी काय माझा असे "

हा आत्मा असूनही दिसत नाही. त्यामुळेच अज्ञानी देवाला तो नाही असे वाटते, म्हणून कोरेकल सांगतात तो आणि तू एकरूपच

आहात. आपल्या अनेक कवितातून कोरेकलांनी आत्म्याची एकरूपताच सांगितली आहे. ही आत्मैक्याची भावना कोरेकलांच्या अतंःकरणात कशी स्थिरावत गेली याचे मोठे मनोरम दर्शन कोरेकलांच्या तीनही संग्रहाच्या कालक्रमानुसार आढावा घेतला तर दिसून येते. आत्मा आणि जीव यांची एकरूपता आणि आत्म्याचे सच्चिदानंद स्वरूप वर्णन करताना कोरेकल म्हणतात-

'' वाटे मी जगतात वावरत, की माझ्यात ते त्यांत मी?
आहे सत्यची मी त्रिकालि म्हणूनी मी सर्व, सर्वात मी ।
सत्यज्ञानमनंत चिज्जडहि मी, काही म्हणा तेच मी
जी जी जाणिव होत जाय मज, ती मद्रूप, सारेच मी ।।

अशाप्रकारे आत्मा हा एकरूप असून तोच परब्रह्म, परमात्मा या नावाने ओळखला जातो. जीव हा अपूर्ण असून त्याचे पूर्णत्व परमात्म्याच्या ठिकाणी असते आणि जीवा-शिवाची एकात्मकता म्हणजेच जीव व परमात्म्याची एकरूपता असून ती साच्चिदानंद स्वरूप असते. हे कोरेकलांनी विविध कवितांमधून वारंवार सांगितलेले आहे.

कोरेकलांनी मोक्षाची इच्छा धरणारा मुमुक्षू आणि मुमुक्षूला आवश्यक असणाऱ्या गुणांचे आपल्या कवितातून ठिकठिकाणी वर्णन केलेले आहे. मुमुक्षूच्या ठिकाणी चित्तशुद्धी निर्माण झाली पाहिजे यावर कोरेकलांचा कटाक्ष दिसतो. चित्तशुद्धि झाली की-

'' सामर्थ्य माझे मला पूर्ण ठावे, म्हणा जे मना काय मानेल ते ?'' असे म्हणण्याचा आत्मविश्वास साधकाच्या ठिकाणी येतो. असे झाले म्हणजे स्वतःच्या ठिकाणी असलेल्या परमात्म्याच्या अंशाची खूण

साधकाला पटते. अद्वैताची खूण ज्याला पटते तोच ज्ञानी ठरतो. विषयवासनापासून मुक्ती सहजासहजी मिळत नाही. त्यासाठी 'गुरुकृपा' व्हावी लागते व समाधान मिळवण्यासाठी सोपा मार्ग म्हणजे भक्तिमार्ग होय. त्यामुळे मुमुक्षूने भक्तीची कास धरलीच पाहिजे असे कोरेकल म्हणतात. या भक्तिमार्गातही नामस्मरणाचा मार्ग कोरेकलांना सर्वात श्रेष्ठ वाटतो. भक्ती आणि नामस्मरणाच्या मार्गाने जी चित्तशुद्धी लाभते तिला कोरेकल 'पीयूषगंगाच ती' असे मानतात. ज्याला देहातच देह धारक विश्वंभर आहे असे पटते तो नर नारायण रूपाला सहजच प्राप्त करून घेऊ शकतो. परंतू हे समजून घेण्यासाठी सकलमत संप्रदायाप्रमाणे ज्ञान, विचारणा आणि धारणा ही आवश्यक असतात. या वाटेने गेल्यास सहजमुक्ती अनायासेच हाती पडते आणि सहजमुक्तीच्या शेवटीच ब्रह्मानंद वास करून असतो. या ब्रह्मानंदाचे दर्शन घ्यावयाचे म्हणजे हे जगत् 'एकरुप' आहे हे जाणून घ्यावयाचे आणि त्यातून मिळणारा जो आनंद आहे तोच 'ब्रह्मानंद' आहे, असे कोरेकलांनी सांगितलेले आहे.

कोरेकल जरी सकलमत संप्रदायाचे उपासक असले त री मुळात सकलमत संप्रदायच भारतीय अद्वैत तत्वज्ञानापेक्षा फारसा वेगळा नसल्याने कोरेकलांच्या कवितातून आलेले तत्वज्ञान व अध्यात्म हे देखील ब्रह्म,.माया, जडजगत, चित्तशुद्धी, सद्‌गुरुउपदेश, साक्षात्कार, मुमुक्षुत्व, मुक्ती अथवा ब्रह्मानंद याच विषयाना धरून आहे. या तत्वज्ञानात कर्मयोगावर फार भर असतो आणि त्यामुळेच दैववादही मोठ्या प्रमाणात असतो. सकलमत संप्रदायाप्रमाणे सर्व देवता एकरूप आहेत. सर्व चैतन्यरूपच आहेत. कोरेकलांच्या कवितातही ठिकठिकाणी शंकर, विष्णु, राम इत्यादी देवतांचा उल्लेख येतो, तो त्या चैतन्य रूप आहेत म्हणूनच.

कोरेकलांच्या भक्तिविषयक कविता पाहातांना अध्यात्म आणि भक्ति एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. अध्यात्मात निर्दुण-निराकार अशा आत्मतत्वाचा विचार केलेला दिसतो तर भक्तीत त्याच निर्गुण-निराकाराच्या सगुण साकाराची आराधना केलेली असते. ईश्वर विषयाची प्रेम आणि श्रद्धा आणि कायावाचामने त्याला शरण जाणे व त्याचे गुणगाण करणे हे भक्तीचे सर्वसामान्य लक्षण सांगता येईल. ईश्वराचे चरित्र गायन करणे, इश्वराशी एकरूप होण्याचा प्रयत्न करणे, ईश्वराजवळ आपले अंत:करण उघडे करणे, ईश्वराजवळ काही मागणी मागणे, या विविधप्रकारांनी कोरेकलांनी आपली भक्ती प्रगट केलेली दिसते.

ईश्वरभक्ती प्रमाणेच गुरु भक्तीचा महिमाही अपरंपार आहे. कोरेकलांनी त्यांचे गुरू मार्तंड माणिकप्रभू यांच्या विषयीची आपली भक्ती भावना आपल्या ग्रंथाच्या केवळ अर्पणपत्रिकातूनच नव्हे तर अनेक कवितातूनही प्रकट केलेली आहे.

कोरेकलांच्या भक्तीपर कवितांमधील विषयाचे वर्गीकरण केले तर ईश्वरभक्ती विषयक व गुरूभक्ती विषयक असे दोन गट दिसतात. ईश्वराविषयी माणसाला प्रेम आणि श्रद्धा वाटते याचे कारण ईश्वर हा सर्वश्रेष्ठ आहे, अद्वितीय आहे. तो मनुष्याला हवे ते देऊ शकतो. यातूनच भक्तीची भावना निर्माण होते. ईश्वराच्या या अद्वितीयत्वाचे वर्णन कोरेकलांनी अनेक कवितांतून केलेले आहे.

'' एकचि तू विश्वात ''ईशा''
दिसशि भिन्न वेशात ''ईशा''

ईश्वरा हा अशा प्रकारे ' एकमेवाद्वितीय' असल्यामुळे तो 'जगद्वंद्य' आहे असे 'जगद्वंद्या' या कवितेतून कोरेकलांनी म्हटले आहे.

असा हा ईश्वर जगामध्ये एकमेव असल्यामुळेच त्याच्याच ठिकाणी आपले मन रमते. संकटाच्या काळी हा ईश्वरच त्याच्या भक्ताच्या मदतीला धावून जातो असे सांगताना कोरेकल म्हणतात-

निर्वाणी प्रभु एक तूच  असशी, धावून येशी घरी।
बैसे ठायि कृपा तुझी बहुति ये पीयूष गंगेपरी ॥
हाकेच्या सरशी उभा प्रभुवरा। वात्सल्य? बोलू कसे ॥
केव्हा, कोठुनि घेतली उडि कशी ? ठावे कुणा होतसे ॥

पण हा विश्वात्मक प्रभू शब्दात पकडता येत नाही. त्याची स्तुती करावयाची तर त्यासाठी त्याच्या सारखाच कवी हवा, अशी भावना ''तुझ्यासम कवी कधी जन्मती?'' या कवितेतून कोरेकलांनी व्यक्त केलेली आहे. ईश्वराचे स्तवन करण्याची इच्छा धरून पुढे सरसावलेल्या श्रुतींना देखील कसे मौनत्व पत्करावे लागते ते सांगताना याच कवितेच्या शेवटी कोरेकलांनी म्हटलं आहे-

'' तव स्तवनलालसा धरुनि जे पुढे धावले।
तुला मिळविल्या क्षणी श्रुतिही शास्त्र मौनावले ॥

ईश्वराच्या भक्तावरील प्रेमाचा व दातृत्वाचा महिमा सांगताना कोरेकलांना शबरीची आठवण येते आणि त्यातून कोरेकल असा निष्कर्ष काढतात की या ईश्वराच्या दातृत्वापुढे व प्रेमापुढे आपली भक्ती करणारा 'नर' आहे की 'वानर' आहे, अथवा 'खार' आहे की 'अस्वल' आहे. याची पर्वा ईश्वर करीत नाही. कोरेकलांचे शब्द असे आहेत-

'' परे विश्वप्रेमावरुनि बघता गोष्ट तिसरी।
कुठे रीसे, खारी, गणही नर वा वानर तरी ॥

या ईश्वराच्या दातृत्वाची अपूर्वता वर्णन करताना कोरेकल म्हणतात

''पोटी नित्य धरोनि रक्षण करी जो आपुल्या लेकरा ।

धावाही नसतो जया कधि हवा, सर्वस्व ज्याचे असे ।

ऐसा तू अमुचा पिता प्रभुवरा ।

भक्तीचा संप्रदाय हा असा संप्रदाय आहे की, त्यात भक्त आणि परमेश्वर यांच्यात एक प्रकारची जवळीक आणि जिव्हाळा निर्माण होतो. यातूनच भक्त आपल्या आराध्य देवतेजवळ काही मागण्या करतो, काही लडीवाळ हट्ट करतो. कोरेकल हे सकलमत संप्रदायाचे उपासक असल्यामुळे त्यांच्या लेखी सर्व देवता समान आहेत. म्हणूनच त्यांच्या काव्यात राम, कृष्ण, महादेव इत्यादी विविध देवताविषयीची भक्ती प्रकट झालेली दिसते.

'' वेणुस्वप्न'' या कवितेत त्यांनी कृष्णाजवळ त्याचा वेणू ऐकव अशी मागणी केली आहे. कोरेकल म्हणतात की कितीतरी शतकापूर्वी कृष्णाच्या वेणूचा आवाज ऐकला होता. या वेणूवर अनेक कवींनी काव्ये केली होती. आता हृदयाचा बाग सुकून गेला आहे, तेव्हा तो फुलण्यासाठी कृष्णाने पुन्हा आपली वेणू वाजवावी. म्हणजे जन्म-मरणाचे सातत्यच निघून जाईल.

दुसरे एके ठिकाणी कोरेकल शंकराजवळ मागणे मागतात की आमच्या या भारताची परवशता दूर कर, '' प्रभू येवढे तरी करी ''या कवितेत ते म्हणतात की ईश्वराने जर त्यांची अल्पशी शक्ती आम्हाला दिली तर दुर्गम संकटाचे अनेक हिमालय आम्ही उलथून पाडू शकतो. पण ही शक्ती न देताही या देशातील लोकांच्या मनात नुसते एकीचे बीज जरी रुजवले तरी सगळी दैन्यावस्था संपून जाऊ शकते. तेंव्हा कोरेकल

मागणे मागतात की " येवढे झणि द्यावे". भारताला त्याचे स्वत्व मिळावे व हरवलेले वैभव प्राप्त व्हावे अशी मागणी ते करतात.

विश्व आणि देश यांच्यासाठी कोरेकलांनी केलेल्या या मागण्यानंतर कोरेकलांनी स्वतःसाठीही काही मागणी केलेली आहे. ते म्हणतात की - " हे ईश्वरा माझ्या हृदयात मी वैराग्याची चिता पेटविली आहे. त्यावर आप्तेष्ट प्रेमाचे प्रेत ठेवले आहे आणि ते लोभ आणि मोहांनी जाळले आहे. तेव्हा हे ईश्वरा, आता तरी तू धाव घेऊन या भक्ताची सुटका करावीस'. पुढे ते म्हणतात की मला तुझ्याकडून कोणतेही दान नको, तर दानाच्या उलटा असलेला तुझा नाद लागू दे, मला तुझ्यापेक्षा तुझी पाऊलेच अधिक आवडतात. ईश्वराचे गुणगान करणारे काव्य आपल्या हातून निर्माण व्हावे एवढेच मागणे ते ईश्वराजवळ मागतात. पण कोरेकलांच्या या मागण्याही स्वतःसाठी नाहीतच. ते म्हणतात-

" विनंती करणे देवा। तरि एक " महादेव"

मत जे महानुभावा तसेच आचरावे "॥

या मागण्या करतानाच कोरेकल मध्येच " उन्मनि" अवस्थेत जातात आणि आत्मभाव विसरतात. ईश्वराशी एकरूपत्व पावल्यानंतर त्यांना असे वाटू लागते की ईश्वराजवळ काही मागणारे आपण कुणी ईश्वराहून वेगळे थोडेच आहोत ? कधी कधी ईश्वराजवळ ईश्वराची मागणी करणे कसे फोल आहे हेही त्याना पटते. थोडक्यात विश्वासाठी काही मागू इच्छिणारे कोरेकल हे ईश्वरभक्तीत रंगून इतके ईश्वरमय होतात की, ईश्वराकडे आपणाला काही मागावयाचे आहे हेच विसरून जातात.

ईश्वराच्या नामस्मरणाची महती लहानथोर सर्व संतांनी मोठ्या अहमहमिकेने सांगितलेली आहे. नामाचा महिमाच असा उत्कट आहे की, नास्तिक माणूस देखील नकळत देवाचे नाव उच्चारतो. मग कोरेकलांसारखा धार्मिक वृत्तीचा कवी ईश्वराचे नाम घेण्यात रंगून गेला असल्यास काही नवल नाही. म्हणूनच आपल्या कवितांमधून ईश्वराचा धावा करण्याच्या निमित्ताने, त्याच्याकडे काही मागण्याच्या निमित्ताने अथवा स्वान्तसुखाय, कोरेकलांनी नाममहात्म्य गायिलेले आहे. कोरेकल म्हणतात तुझ्या नामस्मरणाने-

''ध्याता, ध्यान विसरुनी ध्येय
होतो तत्क्षणी मग तो ज्ञेय
त्वदद्रूपी विचरत विश्वात
हेही राहुनि नच लोकात''.

ईश्वराच्या एकरूपत्वासाठी ईश्वराच्या नामस्मरणाचा ध्यास कसा उपयोगी पडतो ते कोरेकल '' नामरूप'' या कवितेतून सांगतात

''नयनांत-।''रूप'' वदनांत-। ''नाम'' तव वसते ॥
मग काय दुजे ते, प्रभो। तुजविणे उरते ॥

ईश्वर अशा रीतीने आपल्यात आपल्या नामरूपाने भरून असल्यामुळे, ईश्वराच्या नामामधील माधुरी कोरेकलांच्या अंतःकरणात ठसली आहे. ईश्वर सर्वत्र आहे याचाही आत्मप्रत्यय त्यांना आला आहे. म्हणून-

फुलास जरि गाईले तरि तुलाच गातो असा।
ठसा हृदयी खोल उमटवी जशाचा तसा ॥

असा विश्वास त्यांच्या मनात निर्माण झालेला आहे.

मोक्षाच्या मार्गात गुरूशिवाय तरणोपाय नाही. गुरूला शरण जाऊन त्याच्या आशीर्वादाने मुक्ती मिळवणे सोपे जाते. ईश्वरप्राप्तीच्या मार्गावर गुरूचा हात धरून चालणे अत्यंत आवश्यक असते असे सुफी पंथही मानतो. शिष्याच्या अंतःकरणात ईश्वरभक्तीचे बीज अंकुरित करावयाचे व वर श्रद्धेचे जलसिंचन करून शिष्याला सच्चिदानंदापर्यंत पोहचवण्याचे कार्य गुरूच करीत असतात.

गुरूकृपेच्या अनेक आख्यायिका प्राचीन संस्कृत वाङ्‌मयातून प्रचलीत आहेत. मराठीच्या जन्मकाळापासून ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीत गुरूच्या ज्या विविध प्रकारे विनवण्या केल्या आहेत, तोच वारसा पुढे चालत आलेला दिसतो. नामदेव एवढे मोठे संत पण त्यांचे ''मडके'' गुरुवाचून कच्चे राहिले असे सांगून गोरोबांनी त्यांना विसोबाकडे पाठविले. सद्‌गुरुकृपेनेच नामदेव भक्तिप्रेमाच्या अत्युच्च पदावर विराजमान झाले.

यशवंत कोरेकलही याला अपवाद नाहीत. वर पाहिल्या प्रमाणे कोरेकलांचे माणिकनगरच्या मार्तण्ड माणिक प्रभु महाराज यांच्याशी नातेसंबंध तर होतेच पण यशवंतरावांनी त्यांना गुरु मानून त्यांचा महामंत्रही स्वीकारला होता. या सद्‌गुरुला वाट पुसतच कोरेकलांनी अध्यात्म मार्गावरचा आपला प्रवास केलेला आहे, असे दिसते. म्हणूनच या प्रवासात त्यांच्या हातून जी वाङ्‌मयनिर्मिती झाली ती त्यांनी अत्यंत विनम्रपणे आपल्या सद्‌गुरूच्या चरणी अर्पण केलेली दिसते. त्यांच्या तीनही काव्यसंग्रहाच्या अर्पणपत्रिका मार्तंड माणिकप्रभूंना उद्देशून आहेत. केवळ 'अर्पण पत्रिका''च नव्हे तर काही कविताही सद्‌गुरूना उद्देशून कोरेकलांनी केलेल्या दिसतात. गुरूकृपा ही भवतापाने पोळलेल्या चित्ताला थंडावा देणारी सावली असते. म्हणून आपले मन '' गुरुपदधनछाया

शोधण्यास निघाले'' असे कोरोकल सांगतात. श्रीमाणिकप्रभुंच्या सहवासात आल्यानंतर ते म्हणतात,

'' गुरुविण जगि नाही कोणिही तारणारा
त्रिभुवनि नच दीनाकारणे धावणारा ''

हे कोरेकलांच्या लक्षात आले, आणि मग या गुरुला साकडे घालताना कोरेकल विनवणी करतात-

अविरत मम चित्ती ध्यास तूझाच राहो
तनमनधन माझे त्वत्पदी नित्य राहो।

मात्र शिष्याने गुरुची नुसतीच विनवणी करून भागत नसते तर शिष्याने गुरु वर अढळ श्रद्धा ठेवणे हे कर्तव्य असते. गुरुशिष्य कसे नसावेत हे सांगताना कोरेकल म्हणतात-

''जो शिष्य आहे अनुयुक्त ऐसा। गुरुहि ज्याचा अनुयोक्त तैसा
विद्या विरोधी जड होय तैसा॥ समान दोषीं गुरु, शिष्य, पैसा ''

असे पैशाने विकत मिळणारे गुरू आणि त्यांना विकत घेऊ इच्छिणारे शिष्य यांची अवहेलना करून खऱ्या गुरुचे महत्व सांगताना कोरेकल म्हणतात-

सामर्थ्य ऐसे जगि सद्गुरुचे॥क्षणात जाळी अघ पातक्याचे॥
जे देती सायुज्यपदही स्वतःचे॥ सदैव गावे यश एक त्याचे॥

अशा गुरूच्या प्रत्येक शब्दाचे शिष्याने सावध चिताने श्रवण केले पाहिजे असे कोरेकल सांगतात. तसे घडले नाही तर -

'' व्यर्थ मुमुक्षु श्री गुरु वचनी जरि न सावधान
व्यर्थ तया प्रभुने श्रवणास्तव दिल्हे दोन कान ''

गुरूकृपेचा प्रकाश केव्हा फाकेल याचा नेम नाही. त्यामुळे शिष्याने सतत सावधचित्ताने व श्रद्धेने सद्गुरुच्या सेवेत मग्न असले पाहिजे. हा भवसागर पार करावयाचा असेल तर या नरतनुरुपी नौकेचा कर्णधार गुरू असला पाहिजे, असे सांगून कोरेकलांनी भक्तिमार्गात गुरूचे किती महत्व आहे ते सांगितलेले आहे.

गुरूचे असे महत्व एकदा कळल्यावर व श्री मार्तण्डमाणिकप्रभूंना श्रद्धापूर्वक गुरू मानल्यावर आपल्या अंतःकरणातील विविध भावना आपल्या या गुरुसमोर मांडाव्यात हे अगदी सहजच घडते. पण त्यापेक्षाही महत्वाचे म्हणजे आपला सर्व देह, प्रत्येक इंद्रिय गुरूला सन्मुख व्हावे ही कोरेकलांची इच्छा आपल्या गुरुवरील दृढभक्ती दाखविते. आपल्या जिव्हेला कोरेकल आदेश देतात-

माणिक माणिक बोल जिव्हे ।

माणिक माणिक बोल गे ।

कारण-

''नामामृत अती मधुर त्या '' नाहि त्रिभुवनी मोल गे ''

हे कोरेकलांना पूर्णपणे पटलेले आहे.

गुरू हे असे सर्व संकटातून तारून नेणारे असल्यामुळे व मोक्षप्राप्तीच्या मार्गावरील एकमेव उपाय असल्याने कधी कधी तर

कोरेकलांना ब्रह्म आणि मोक्षापेक्षाही माणिकप्रभूच अधिक हवेहवेसे वाटतात.

अशावेळी कोरोकल म्हणतात-

तूचि एक आम्हा सर्व गणगोत ।। ब्रह्म ओतप्रोत ।

माणिका तू ।।

तूचि जग, स्वर्ग, वैकुंठ, कैलास ।।

मायिक हे भास जगत्सर्व ।।

कोणी नये कामा तुझ्या पायावीण ।

व्यर्थ शास्त्र क्षीण, ब्रह्मज्ञान ।।

त्यामुळे कोरेकलांची रसवंती जिव्हा या माणिकप्रभुंचेच गायन करू लागते, '' रेगारे'', आणि '' गारे माणिक तो'' या दोन कविता तालासुरांचा आधार घेऊन व स्वरमंजुषेवर बसवून कोरेकलांनी त्या रागात बांधल्या आहेत. गायन करता येतील अशा या कविता मधूनही

'' रेगारे माणिक प्रभु सकळ-सुख-धाऽम''

आणि

'' गारे माणिक तो जगदोद्धाऽर ''

ही आपल्या गुरुची रूपे कोरेकल सांगतात आणि आपला सर्व भार या सद्‌गुरुवरच टाकतात.

श्री माणिकप्रभूवरच आपल्या उद्धाराचा सर्वभार टाकल्यानंतर त्यांच्याशी एकरूप होणे व त्यासाठी त्यांच्या महामंत्राचे स्मरण सतत

करणे हे ओघानेच येते. कोरेकलांनी या महामंत्रातील एकेका अक्षराने कवितेची एकेक ओळ सुरू होईल अशी चित्रकाव्ययुक्त रचना असलेली, ''श्री प्रभुमहामंत्र आर्या'' ही कविता लिहिली आहे. तिची सुरुवातच,

'' श्री गुरुमाणिक जयगुरुमाणिक वद भक्तिने सदा रसने।
भक्तकार्यकल्पद्रुम तो प्रभुमनि भजुनि अंतरी रसने ''॥

या ओळीने करून पुढे एकेका ओळीतून आपल्या या सद्गुरुंचे मोठ्या भक्तीने वैशिष्ट्य वर्णन ते करतात.

माणिकप्रभुंविषयीची ही जी श्रद्धा व भक्ती कोरेकलांच्या ठायी अत्यंत खोलवर रूजलेली होती, त्यामुळेच मार्तंड माणिकप्रभूंचे जेव्हा देहावसान झाले तेव्हा कोरेकलांचे हृदय दुःखाने भरून यावे व तत्वज्ञान पचवलेल्या कोरेकलांनाही आपला शोकवेग आवरता येऊ नये हे अगदी साहजिक आहे.

'' माणिकनगरचा हिरा हरपला'' व '' अश्रुधारांजली'' या दोन कवितामधून कोरेकलांनी आपला हा शोकवेग प्रकट केला आहे.

त्या वातावरणाचे वर्णन करताना कोरेकल म्हणतात,
'' अलाप निघते जिथे भजनरंगि रंगोनिया
विलाप अजि ऐकुनी हृदय जाई भंगोनिया ''

आपल्या सद्गुरुंचे देहावसान झाले आहे हे प्रथम कोरेकलांना खरेच वाटत नाही. ते म्हणतात,

जलांत कलिका कशी सुकलि काय हे अद्भुत।
बुडोनि मृत जाहला अमृतकुंडि? नाही श्रुत।

परंतु असा शोक करतानाही नंतर कोरेकलांच्या मनात त्यांच्या मूळ वृत्तीप्रमाणे तत्वज्ञानाचा उदय होतो आणि स्वतःला सावरून ते म्हणू लागतात-

प्रभुत्व प्रभु त्यागुनि अजि विभुत्व तो दाखवी
विभक्त नच तेल हे सहृदभक्त की भासवी
आम्हास जणु तो प्रभू म्हणाल हा '' तुम्हाला भ्रम
ममांश मम भक्त हे मग कुठे तया विभ्रम? ''
प्रभु रूसलिया रूसो सदय़ नाम ते आठवू
तदीय यशपीयुषा हृदयि सर्वदा साठवू ''

कोरेकलांनी '' सुमनसौरभ'' या त्यांच्या काव्यसंग्रहाच्या शेवटी या ग्रंथाचे प्रकाशन पहावयास हयात नसलेल्या आपल्या सद्गुरूमाऊलीच्या समाधीवर एक प्रदीर्घ '' अश्रुधारांजली'' वाहिली आहे. तिच्या प्रास्ताविकातच ते म्हणतात.

'' जन्मापासूनच उघड्यात वाढलेला मी तरी गुरु माऊलीच्या मायेच्या पदराखालील छायेत अर्ध्या आयुष्यभर वावरत राहून अर्धी मजल गाठली. तो आता तर पुरापुराच उघडा पडलो''

गुरूला साद घालताना कोरेकल म्हणतात,
अगा गुरुवरा तुवां अवचनीय केले कसे।
मधीच उठुनी कुठे गमन काय केले असे ॥

गुरुवाचून हे जग कसे दिसते याचे वर्णन करताना कोरेकलांनी म्हटले आहे-

भयाण जग हे दिसे दशदिशी उदासीनता ।

तुझ्याविण जगत्रयी कशी जगेल आकर्षता ।

नसे निशि तरी दिसां दिसत सूर्य नाहीचसा ।

नितांत तम सारखा हृदयि शोक दाटे जसा ॥

श्री माणिकप्रभूच ज्यांचे सर्वस्व होते ते कोरेकल गुरूचा मृत्यू ही त्यांची स्वतःचीच इच्छा होती हे जाणतात. पण आपले मन मात्र आवरू शकत नाहीत. आपण गुरुकडे कधीच काही मागितले नाही, तरी त्यांनी आपणास का सोडून जावे याचे मोठे नवल कोरेकलांना वाटते. आपल्या ठिकाणी असलेल्या सर्वकला म्हणजे गुरूचीच कृपा होय असे ते म्हणतात.

कोरेकलांच्या जीवन चरित्राकडे पाहिले तर त्यांचे सारे आयुष्य दुःखाने होरपळून निघालेले होते असे दिसते. या दुःखात तारक म्हणून कोरेकलांना सद्गुरुंचा आसरा वाटावा हे अगदी साहजिक होय. परंतु केवळ सांसारिक दुःखावरचा उपाय म्हणून कोरेकल माणिकप्रभूंकडे पाहात नाहीत, तर आपली आध्यात्मिक दुःखे दूर करून मनःशांती मिळवून देणारे म्हणूनही त्यांना माणिकप्रभूंचा आधार वाटतो. मराठी काव्य क्षेत्रातील संताची प्राचीन कविता सोडली तर आधुनिक कवितेमध्ये अशी गुरु-शिष्य परंपरा दुसरी सापडत नाही. गुरू वरील एवढी अढळनिष्ठा व गुरुचे एवढे श्रद्धापूर्वक गायन इतर कोणीही आधुनिक मराठी कवीने केलेले दिसत नाही. याचे कारण उघडच आहे, आधुनिक मराठी कवींच्या व्यक्तिमत्वाची बीजे लौकिकात रूजलेली आहेत तर कोरेकलांच्या व्यक्तिमत्वाची मुळे पारलौकिकच्या क्षेत्रात पसरलेली आहेत.

कोरेकलांनी काही निसर्ग कविताही लिहिलेल्या आहेत. या निसर्ग कवितातून भावनेच्या उमाळ्यापेक्षा बौद्धिकतेचा उमाळा अधिक दिसतो. कोरेकलांची मनोवृत्ती भोवतालच्या निसर्गाचे वर्णन करून, त्याद्वारे ईश्वराची वाङ्मयीपूजा करण्याची होती. निसर्गातूनही कोरेकल अध्यात्माकडेच वळतात. 'वारा' या कवितेत ते म्हणतात वारा केव्हा कसा वाहील याचा नेम नाही. तसेच जीवनात दैव केव्हा कसे फिरेल हे सांगता येत नाही. म्हणून या जीवनाचा लोभ किंवा मोह सोडून ईश्वरचरणी लीन झाले पाहिजे - अशा निष्कर्षावरती कोरेकल येतात. ''वारा'' या शब्दावर श्लेष साधीत लोभ, मोह, ''वारा म्हणजे सोडा'' असे कोरेकल म्हणतात तेव्हा त्यांच्या कवितेतील बौद्धिकता अधिकच उठून दिसते. त्याच प्रमाणे ''वावटळ'' या कवितेतही ज्या प्रमाणे वावटळ कोठून येते व कोठे जाते हे कळत नाही, तसेच मानवी जीवीताचे आहे, येथे मृत्यू कोणत्या रूपात व कसा येईल ते समजत नाही, असे सुचवीत कोरेकल निसर्ग आणि मानवी जीवन यांचा संबंध जोडतात. निसर्गाची विविधरूपे म्हणजे, ''देवाजीचा खेळ सारा'' असेच कोरेकलांचे मत दिसते.

पाण्याचाकी चुकूनहि नव्हता जेथ अत्यल्प लाग ।
झाले कैसे ? कुठिनि फुलला वाळवंटात बाग ॥

या प्रश्नाचे उत्तर ही कोरेकलांच्या मते ''त्रैलोक्यनाथ'' हेच आहे. दवबिंदुच्या नश्वरतेत कोरेकलांना मानवी जीवनाची नश्वरता आढळते. कोरोकलांच्या अंगी भारतीय तत्वज्ञानातील अद्वैत सिद्धांत मुरलेला आहे. त्यामुळेच मानव व निसर्ग यांचे नाते जोडता जोडता कोरेकल त्यातूनही ईश्वरी साक्षात्कार पाहू लागतात.

परमेश्वर सृष्टीतील सर्व वस्तुरूपात असूनही त्याला स्वतःला रूप नाही, तो रूपातीत आहे, हे तत्वज्ञान कोरेकलांच्या ठिकाणी मुरलेले असल्यामुळे ते सहजच म्हणून जातात-

" ज्यांची जी रूपे तेवि नाहीत तेही

वाटे जे काही राहते काहि बाही

देखावा ऐसा सर्व आहे भ्रमाचा

देवाजीचा खेळ सारा मजेचा "

झाडे, नक्षत्रे, चंद्र, सूर्य, यांचे पाण्यात पडलेले प्रतिबिंब पाहून ते पाण्यातच आहेत असे वाटते, पण तो भास असतो, कारण ते सर्व आपापल्या ठिकाणीच असतात. त्यांचे पाण्यातील प्रतिबिंब हा 'भ्रमाचा देखावा'' आहे. मायेने व्याप्त असे जगही तसेच आहे.

बालकवीच्या कवितेत जळात पाय टाकून बसलेला औदुंबर दिसतो, तर कोरेकलांच्या अध्यात्म प्रवण मनाला एखाद्या तपस्व्या सारखा एकाग्र मनाने उग्र तपस्या करणारा तपस्वी असा वट दिसतो.

पक्षांचा आवाज ऐकून झाडे आनंदाने डुलतात. दुर्वांकूर माना उचलून वर पाहातात. पर्वताच्या शिखरावरून रुप्याचे झरे वाहातात, पर्वताच्या मांडीवरून निर्झररूपी कन्यका खेळतात आणि लाल पिवळ्या रंगाचा जणू राजमुकुटच पर्वताच्या मस्तकावर ठेऊन किरणांच्या चवऱ्या दिक्पाल ढाळत आहेत असे कोरेकल म्हणतात. पण या निसर्गवर्णनात ही त्यांची तत्वज्ञानाची वृत्ती लपून रहात नाही आणि कवितेच्या शेवटी ते म्हणतात-

“ जो सोया नर वोहि गमाया, जागा सो पाया ”
हाच रे उन्नतिचा पाया ”

कोरेकल आपल्या कल्पनेचा पतंग उंच उडवीत असताही आपल्या हातातील तत्वज्ञानाचा धागा सुटू देत नाहीत. कोरेकल निसर्गाचा पसारा पाहून आनंदून जातात आणि त्यांना वाटते की या विश्वात आपण विनाकारण वृत्तित्वविहिन होऊन बसलो आहोत. निसर्गालाही सुख, दुःख आहे पण त्याने हा निसर्ग दुःखी होत नाही, उलट नव नवा दिसतो. जुने ते नष्ट होणार आहे व त्या ठिकाणी नवे येणार आहे. हा निसर्ग खेळ कोरेकलांना पटलेला आहे. म्हणून या सृष्टीवर येणाऱ्या नववत्सराचे स्वागत करण्यास ते उत्सुक होतात.

नववत्सराचे आगमन होत आहे हे पाहून उत्सुक झालेला हा निसर्ग उषेद्वारे गुलाल उधळून त्याचे स्वागत करीत आहे. सूर्य जणू केशरी सडा टाकत आहे. कोकीळ आनंदात गात आहेत आणि धबधबा जणू चौघडा वाजवून त्याचे स्वागत करीत आहे. झाडे जुनी पाने वस्त्रे टाकून नवीन वस्त्रे नेसून या नव्या वर्षाच्या स्वागताला सिद्ध झालेली आहेत. या चांदण्यानी जणू काय लाजून आपले मुख लपवलेले आहे. अशा सुंदर कल्पना करून कोरेकल म्हणतात, “ज्यांच्या अंतःकरणात दुःख आहे त्याला हा निसर्ग आपल्या मायेने सुख देण्याचा प्रयत्न करतो ” कोरेकल म्हणतात, तुझ्या आगमनाने जशीं झाडाना नवी पालवी दिसते त्या प्रमाणे आम्हाला सुदिन दाखव. आमचे ही वाईट दिवस घालवून टाक आणि आम्हालाही चांगले, नवीन जीवन दे ”.

“ गिरिराज” या कवितेत कोरेकल या निसर्गाच्या किमयेच्या अनेक कल्पना मांडतात व त्या माध्यमातून पुन्हा उपदेश करतात, तत्व सांगतात.

या सूर्याने कितीही प्रखर आग या गिरिवरती ओतली तरी हा डगमगत नाही. तो शातंच राहातो, उलट त्याला वाटते की, हा सूर्य विनाकारण का रागावत आहे. स्वतः गिरिराज मात्र कधीही संतापत नाही, म्हणून त्याला ''गिरिराज'' ही पदवी शोभते. आपल्या सावलीने तो सर्वांना सुखावतो. तो आपले धैर्य केव्हाही सोडत नाही. तो आतल्या आतच जळत राहील पण आपले दुःख दिसू देणार नाही. आपले अश्रू जणू काय तो हिरव्या गवतात लपवून ठेवतो. त्याचा आतल्या आत कितीही भडका उडत असला तरी दुसऱ्यावर तो शांत सावली धरतो. तो कितीतरी मुक्या प्राण्यांना आश्रय देतो. जे प्राणी थकून भागून त्याच्या आश्रयाला येतात त्यांचा तो उत्तम पाहुणचार करतो. त्याच्या घरात कशाचीही उणीव भासत नाही. हा गिरिराज सर्वांचा पाहुणचार फार चांगल्याप्रकारे करतो. त्याच्या ठिकाणी आलेल्या पांथस्थाची पायधूळ घेऊन, त्यांचे स्वागत फुले उधळून करतो, शीतल मंद वारा घालून त्यांना सुखावतो आणि हळूवार झुळुकां करवी त्यांचे पायही चूरत बसतो, आपल्या वृक्षाकरवी त्यांना गोड फळे, कंदमुळे देऊन त्यांची भूक भागवितो व आपल्या सुंदर, निर्मळ, निर्झरातील थंड पाणी प्यायला देऊन त्यांची तहानही भागवितो. थकलेल्या शिणलेल्यांवर तो सतत दया करतो.

करि स्वागत लागत पाय धुळी ।
बसताच फुले वरूनी उधळी ।
मग विझंण शीतल मंद करी ।
झुळुका करवी पदही चुरवी ॥

असे सुंदर कल्पनारम्य वर्णन कोरेकल सहज करुन जातात.

या दृष्टीने निसर्गातील सौंदर्य पाहू शकणाऱ्या कोरेकलांची कविता गूढगुंजनाकडे न वळता अध्यात्माकडे वळते असे दिसते. वास्तविक कोरेकल मराठीतील रोमँटिसिझमच्या प्रवाहात वाढले, त्या प्रवाहातून त्यांनी साधे विषय, अटोपशीर कविता, मात्रा-वृत्तांचा उपयोग, सैलसर रचना इत्यादी बाह्यविषय उचलले पण त्यांचा मूळ पिंड अध्यात्माचा असल्यामुळे त्यांच्या कवितेचा आशय मात्र रोमँटिसिझमच्या प्रभावाखाली आला नाही. त्यांची कविता ही रोमँटिसिझम आणि भारतीय परंपरागत अध्यात्म यांच्या सीमा रेषेवर वावरणारी कविता राहिली.

राष्ट्रीय प्रवाहात लोकमान्य टिळक आणि महात्मागांधी यांच्या कार्यकाळात मराठीत राष्ट्रवादी कवींची एक मोठी परंपरा उदयाला आलेली दिसते. मायभूच्या शूरवीर पुत्रांचे पूजन, राष्ट्रविषयीचे प्रेम, स्वातंत्र्याची ओढ, पारतंत्र्याची चीड आणि अन्यायाचा प्रतिकार या विविध विषयांमधून ही राष्ट्रवादी कविता प्रकट होत गेलेली दिसते.

कोरेकलांच्या राष्ट्रीय कवितेत भूमातेबद्दल प्रेम, भारताबद्दल वाटणारे प्रेम, त्याच्या पूर्ववैभवाच्या आठवणी, पारतंत्र्याबद्दल दुःख, पारंतत्र्याविरुद्ध लढणाऱ्या देशभक्तांबद्दल प्रेम व आदर, देशभक्तीचा गौरव, महाराष्ट्राबद्दलचे प्रेम आणि त्यांच्या आध्यात्मिक व भक्तीप्रधान कवी पिंडाला अनुसरून भारताचे पारतंत्र्य दूर करण्याबद्दल परमेश्वराजवळ केलेली प्रार्थना, असे नानाविध विषय आलेले आहेत.

ज्या पृथ्वीवर आपण जन्मास आलो, त्या पृथ्वीविषयी मानवाला सदैव प्रेम व आदर वाटत आला आहे. तिला आपली आई मानून '' भूमाता '' अशी पदवी कवींनी पृथ्वीला दिली. कोरेकलांनीही ही परंपरा पाळत '' मातृप्रेम'' या कवितेतून या भूमातेचे गुणगान गाईले

आहे. ''भूमातेविण या विशाल जगती दूजी नसे एकही '' असे तिचे अनन्यत्व सांगणाऱ्या कोरेकलांची कल्पनाशक्ती भूमातेवर सगुणत्वाचा आरोप करून नानाविध कल्पना करते. ते म्हणतात-

'' सप्राणासम गर्भिणी जपुनिया गर्भास रक्षी जसे ।
होता प्रेतहि त्यागिता न उदरी ठोवोनि घेई तसे ॥
केले दग्ध जरी न लोटित दूरी अंकासही हालवी ।
भूमातेविण कोणती जननि हो । वात्सल्य ते दाखवी ॥.

या प्रकारे भूमातेचे वात्सल्य कोरेकल दाखवितात.

कोरेकल ज्या काळात वावरले व वाढले तो काळ भारतीय स्वातंत्र्य लढ्यातील फार मोठ्या घडामोडीचा काळ होता. टिळक व गांधीजींचे राजकारण येथे मोठ्या हिरिरीने चालू होते. अशा या काळात सर्वसामान्य विश्वप्रेमाच्या भावनेबरोबरोच राष्ट्रप्रेमाच्या भावना कोरोकलांच्या मनात उमडू लागल्यास नवल नाही. भारताच्या पूर्व वैभवाच्या आठवणी कोरेकलांच्या कवितेत मोठ्या प्रमाणात आढळतात.

'' जगास भूतकाल तो तुझा अजूनि आठवे '' असे सांगणारे कोरेकल या भारताला सांप्रतकाळात झोपी गेलेला पाहून जणू, '' उठ । उठ । भारता । पुरे ती झोपेतिल शांतता ।'' असे बजावून सांगतात. त्याच्या वैभवाची गाणी कोरेकल मोठ्या आवडीने गातात. '' तो हिन्द माझा असे '' असे म्हणून या हिंदभूचे एकेक वैभव कोरेकल उत्कटतेने सांगू लागतात. त्यात काश्मीर पासून हिन्दूस्थानच्या अनेक प्रदेशातील वैशिष्ट्याचे वर्णन करतात आणि अशा ''सद्गुणी भारताला'' ते पुन्हा गेले वैभव परत मिळवावयास '' निद्रा त्यागुनि ऊठ सत्वरि आता'' असे

म्हणतात. इंग्रजानी येथले सर्व वैभव लुटले हे " हंपी" ला कोरेकलांनी भेट दिली असता त्यांना तीव्रतेने जाणवली, पण " नेलि लक्ष्मी म्हणोनि झालि का ही " हिन्दमाता" गता?" असा सवाल करून कोरेकल म्हणतात, "या नाशावदोषामुळे " च तुझ्या गत वैभवाची खूण पटत आहे. भारत हा रामाचा देश आहे, वीराचा देश आहे आणि त्याचे भावी रूप दिव्यातले दिव्य आहे असे सांगून कोरेकल या राष्ट्राच्या सौभाग्याची स्वप्ने पाहातात.

स्वदेशीचा मंत्र महात्मा गांधीनी दिला होता. त्याचा प्रतिध्वनी कोरेकलांच्या मनात ही उमटलेला आहे. ते म्हणतात-

शुद्ध देशी वस्तुवीण ।<br>
नाच व्हावा घरी सण ॥<br>
नाही फटाकड्या देशी ।<br>
तेव्हा दिवाळी ही कशी ?

असे म्हणणारे कोरेकल

गेले बंधू सत्याग्रही ।<br>
आनंदोनी कारागृही ॥<br>
बद्ध ते आंधारी<br>
दिवे लावावे का घरी ॥

असा खडा प्रश्न टाकताना दिसतात, तेव्हा देशभक्ताबद्दलचा त्यांचा आदर सहजगत्या स्पष्ट होतो.

देशासाठी प्राणार्पण करणाऱ्या देशभक्तांची " धन्य धन्य ती भक्ती" असे म्हणून त्याचे वर्णन करताना कोरेकल म्हणतात-

" प्रेमासाठी ढळुनि वरूनी नित्य येतात खाली ।"
तसेच
" देशापायी सुखहि त्याजिती, लोककार्यार्थ अंती
प्राणज्योत निज विझविती "धन्य ती धन्य भक्ती"

भारताला पारतंत्र्याची ही दैन्यावस्था येण्याचे कारण कोरेकलांच्या मते बाजीप्रभू, शिवाजी सारखे मायभूचे पूत आता उरले नाहीत. म्हणून आजही विपरीत दशा देशाच्या नशीबी आली आहे. स्वतःबद्दल बोलताना ते म्हणतात -

" आम्ही बाभळी वनाचे । लाकूड जाळण्याचे "

आणि मायभूच्या त्या पुत्राबद्दल बोलताना कोरेकल म्हणतात-
" गेलेहि जरि जळोंनी । सौगंध दरवळोंनी "
जे वृक्ष चंदनाचे । ते पूत मायभूचे "

आम्ही देशाला भारभूत ठरलो आहोत ही वस्तुस्थिती ध्यानी घेऊन आम्ही देशभक्तांसाठी मायभूचे सुपूत होण्याचा आदर्श समोर ठेवला पाहिजे. असे कोरोकल कळकळीने सांगतात.

याच कोरेकलांचा मूळ पिंड अध्यात्मप्रवण आहे. ईश्वरभक्ती हा त्यांचा निसर्गदत्त स्वभाव आहे. हे बघता या सर्वातून शेवटी ते ईश्वरभक्तीकडेच वळतात आणि त्यामुळे " एवढे झणि द्यावे" या कवितेत ते ईश्वराजवळ जणू पसायदान मागतात-

'' बा । जगदीश महेशा । सालिकचि सदावेशा ।
देऊनि पुरवि आशा ।। दीन दैन्य हरावे।।
विसरवी भेदवैर ।। समता विचरो स्वैर।।
सतत असा दे धीर ।। महत्कार्य घडावे ।।
नेत्रपूर अंतरूनी ।। अंगात सळसळोनी ।।
खेळत असुनी पाणी ।। इतरा पाजवावे ।।
स्वत्व सदैव वसावे ।। हरवले ते मिळावे ।।
हेच भारतास हवे ।। येवढे झणि द्यावे ।।

यातून समता, स्वातंत्र्य आणि स्वत्व या तीन गोष्टी कोरेकलांना महत्वाच्या वाटतात. सत्याने स्वातंत्र्य मिळते, स्वातंत्र्याने समता येते. आणि समतेतच भारताचे स्वत्व आहे, हा कोरेकलांच्या राष्ट्रीय विचाराचा व राष्ट्रीय कवितेचा परिपाक आहे असे त्यांच्या कवितावरून दिसते.

या राष्ट्रभक्ती सोबतच जिथे आपली मातृभाषा बोलली जाते त्या महाराष्ट्राबद्दलही कोरेकलांना विलक्षण प्रेम आहे. या महाराष्ट्रात जन्मणाऱ्या भाग्यवंताबद्दल ते म्हणतात,

'' किती भाग्याचा-जन्म म्हणावा त्याचा । म्हणविला महाराष्ट्राचा ।
ज्या देशाचा पोरहि परि मोठ्याचा । नत्र अशा तशा राष्ट्राचा ।

या महाराष्ट्रात जन्माला आलेला माणूस, '' स्वार्जितावरी जगलेला'' असे ते अभिमानाने सांगतात. त्याचे वर्णन करताना कोरेकल म्हणतात-

'' जशी आत सावळी मूर्ती ।
काळीच कांबळी वरती ।
कधि अर्धी, कधि ती पुरती ।
जी शाश्वतिची - स्वर्जित जी संपत्ति '' ।

असा हा महाराष्ट्राचा मावळा -

" जरि कालवहो - क्षणभरि दुबळा दिसला।

परि उभा प्रसंगी पहिला "

असे वर्णन करून " मावळ महाराष्ट्राचा" या कवितेत कोरेकल म्हणतात-

" कसलाहि तरी थोरचि महाराष्ट्राचा" जरि पोर परिहि सिंहाचा "

या मावळ्याचे

पाठीस लागले पोट।

छातीचा तरि करि कोट ॥

असा हा महाराष्ट्र आणि त्यातील मावळ्याचे वर्णन करताना कोरेकल भारावून जातात.

व्यवसायाने सरकारी नोकरीत असूनही कोरेकलांनी राष्ट्रभक्तीची ही गाणी गायिली हे विशेष होय. मराठी कवितेत केशवसुतांपासून स्वातंत्र्य. समता व बंधुता यांचा जो उद्घोष सगळेच राष्ट्रिय कवी करत होते. त्याच प्रवाहात कोरेकलांची राष्ट्रीय कविताही सामील झालेली दिसते. कोरेकलांच्या कवितेत सावरकरांसारखा आवेग व उमाळा नसेल पण विनायकासारखा गत इतिहासाचा अभिमान त्यांच्या कवितेत निश्चित दिसतो. कोरेकल मवाळ पंथीय राष्ट्रीय कवी होते.

यशवंत कोरेकलांसारखा गंभीर, प्रौढ, तत्वचिंतक, प्राधान्याने अध्यात्म आणि भक्तीपर कविता लिहिण्यारा कवी विनोदी कविता लिहितो हे वरवर पाहाता खरेच वाटत नाही. पण कोरेकलांनी सुमारे २५ विनोदी कविता लिहिल्या आहेत. कोरेकलांच्या ठिकाणी असलेल्या उपजत

रसिकतेने जीवनाच्या या निर्मळ आणि हलक्या फुलक्या अंगाला केलेला [illegible] म्हणजे त्यांच्या विनोदी कविता होत.

जीवनाकडे अतिशय गांभीर्याने व तत्वप्रचुर दृष्टीने पहाणारे कोरेकल त्याच जीवनाकडे असे उपहासपूर्ण कटाक्ष कधी-कधी टाकतात. ''कवीची बैठक'', ''मोक्तिकमाला'', ''व्याख्यान'', ''व्यवहारमग्न'', ''मनुजा'', ''नर्तन'', ''योगायोग'' या सारख्या कवितांमधून कोरोकलांनी गंभीर विषयांचे हास्यपूर्ण दर्शन घडविले आहे.

''कवीची बैठक'' ही कोरेकलांची ५९ कडव्यांची दीर्घ कविता आहे. या कवितेत जिथे काव्यशास्त्र विनोद चलावयाचा त्या कवींच्या बैठकीत काय काय प्रकार चालतात आणि आपलेच घोडे पुढे दामटण्याचा प्रत्येक कवी कसा प्रयत्न करतो याचे मोठे उपहासपूर्ण वर्णन कोरेकलांनी केलेले आहे. या कविबैठकीत सर्व प्रथम वाद होतो तो कवी अथवा काव्य श्रेष्ठ कशामुळे ठरते यावरून. सर्व कवींची मते ऐकल्यानंतर कोरेकल हलकेच म्हणतात-

जैशी उत्तम मध्यमाधम दशा आहे अवस्थात्रयी।
तैशी या कविमाजिही अनुभव येते जना प्रत्ययी॥
कोणी सात्विक, कोणि राजस, तसे आहेत ही तामसी॥''

सात्विक कवीच्या वहित प्रत्येक पानावर, शंकर, राम, कृष्ण, असे लिहून खाली कविता लिहिलेली असते. असा हा कवी-

'आकाशातचि जास्त काल रमतो स्वर्गादि भूमिहुनी॥

अशी ते त्याला एक टपली मारतात. त्याचे सामर्थ्य वर्णन करताना कोरेकल म्हणतात-

जीर्ण क्षुद्र अशा मलीन घरच्या कोन्यात बैसोनिया।
त्रैलोक्यी मनसोक्त की विहरतो सामर्थ्य याचे पहा॥
राजस वृत्तीच्या कवीबद्दल कोरेकल वर्णन करू लागतात -
कोणी श्लोकमिषे निरीक्षण करी श्रोता कसा ऐकतो।
कोणा नावडते मदीय कृति ही कि कोण संतोषतो॥

पण एकूणच राजसवृत्तीच्या कवीसंबंधी कोरेकलांना थोडेसे प्रेम वाटत असावे असे दिसते. कोरेकलांची हास्यवृत्ती तामस कवींच्या वृत्तीचे वर्णन करताना उफाळून येते. कवीच्या बैठकीत हे तामस वृत्तीचे कवी राजसांना बळे बळे ढकलून देतात आणि हास्यरसाच्या कविता ऐकवितात. या तामस कवींचे अनेक प्रकार वर्णन करताना कोरेकल म्हणतात की, एकजण सदैव कविता वाचतो तरी, करतो तरी, किंवा लिहितो तरी. एकाचे लिहिणे कल्पनेच्या आकाशातच आणि पृथ्वी हीच त्याची वही असते. एकजण सदैव पद्यातच बोलतो. त्याची टवाळी उडवताना कोरेकल म्हणतात-

प्रेमी, मित्र व आप्त, इष्ट कविता मातापिता वा सुता।
कांता, भ्रातृ, कुटुंब वा सदनही की वस्तुही तत्वता॥
की ज्याचे हतरून पांघरुणही तैसे शिरस्त्राणही॥
जो सर्वस्वही काव्यपूर्ण समजे देहासवे प्राणही॥

एक कवी पत्र देखील वृत्तपूर्ण असे पाठवतो. (येथे 'वृत्त' शब्दावर कोरेकलांनी केलेली कोटी पहाण्यासारखी आहे.) एक तामस कवी तर आपल्या मनातला भाव गाऊन दाखवितो, त्याचे वर्णन करताना कोरेकलांमधला संगीतज्ञ जागा होऊन म्हणू लागतो-

" जेव्हां हा खुलतो पिलू अळवतो, दुर्गात रागावतो।
दुःखाने कधि भैरवीत रडतो, भूपांत संतापतो ॥
स्वप्राणा करूणाचि भाकुनि जणू, तोडीत तोडीतसे।
झिंजोटीपद गाऊनी फिरूनीया प्रेमास जोडीतसे ॥
की जेव्हा झगडे तधी ध्रुवपदा, धम्माल, झंपा म्हणे।
तल्लाना जधि की म्हणेल समजा ते सौम्य रागावणे ॥
घाईने जणू दादऱ्यांत वदण्या हा वाजवी ताम्हणे।
सांगे की जणू सोवळ्यांत तबला स्पर्शू नये ब्राह्मणे ॥

एक कवी कोंबड्यासोबत कोंबडा लढवावा तसा श्लोकाशी श्लोक लढवतो, एकजण विविध वृत्ताचे गणच स्वप्नात बडबडू लागतो. एखादा एकेका वृत्ताचे "व्रत" घेतल्यासारखा आठ आठ दिवस एकाच वृत्तात कविता करू लागतो असे कोरेकल म्हणतात आणि शेवटी-

एका मागुनि एक वृत्त सगळे साद्यंत की संपता।
मौजेने कधि लावण्याहि करितो हा चालता बोलता ॥
चातुर्मास पदोपदी पदरची ऐसी समाप्ती करी।
तेथोनि व्रत संपवोनि फिरूनी " वृत्तव्रता" आचरी ॥

(यातही 'वृत्त' शब्दावर कोरेकलांनी केलेली कोटी मोठी मार्मिक आहे.) यमक्या कवीचे कोरेकलांनी केलेले विडंबन प्रत्यक्ष यमक साधूनच केलेले असल्यामुळे सोदाहरण झालेले आहे. यमक्या कवी प्रमाणेच " अनुप्रास" साधणाऱ्या कवीचेही कोरेकल हास्यरसपूर्ण वर्णन करतात. अशा कवीला-

जैसा प्रास पती अपत्य गमती तैसे अनुप्रास ।
दोघेही नसल्यास खास विधवा, वंध्याच की भासते ॥

भाषा बहुल कवीच्या कवितेत चरणात एकदा आलेले अक्षर पुन्हा कोणाला दिसणार नाही अशी कसरत असते. तिला टोमणा मारताना कोरेकल म्हणतात,

अंधारातिल खोल कूप समजा पाणी न जेथे वसे ॥

अशा प्रकारे नाना प्रकारच्या कवींची, त्यांच्या सवयी, त्यांच्या खोडी, त्यांची कधी टिंगल करीत, कधी अतिशयोक्ती करीत कोरेकलांनी मोठी हास्यरसपूर्ण चित्रे काढलेली या कवितेत दिसतात. स्वतः कवी असूनही आपल्याच कवी बांधवाची अशी मार्मिक व्यंगचित्रे काढणाऱ्या कोरेकलांच्या अंतर्मनात विनोदाचा निर्मळ झरा कसा खळखळत होता- ते या कवितेतून दिसते.

''मौक्तिकमाला'' हाही तसा गंभीरविषय, पण याच निर्मळ अंत:करणाच्या बळावर कोरेकल मुक्त आणि पाणी या शब्दावर श्लेष करीत सहजपणे त्याची हलकी फुलकी अभिव्यक्ती करतात. '' पाणी'' या शब्दावर श्लेष करताना कोरेकल म्हणतात-

देऊनि पाणी बनविति शस्त्रे
ती रुधिराने भिजविति वस्त्रे
पाजुनि पाणी पळवित लोका
एकचि पाणी पटवि अनेकां ॥
मौक्तिकमाले ! महती तुझी ती
नाहिच्न कांही लव तव हाती

दाऊनि पाणी म्हणविशी मोती
तत्क्षणि होशी नच तर माती ।।

व्याख्यान हा असाच एक आणखी गंभीर विषय. पण त्या बद्दलही सामान्य माणसाचे काय मत असते ते कोरेकल आपल्या कवितेतून खेळकर पद्धतीने सांगातात.

गद्य व काव्य हा एका व्याख्यानाचा विषय आहे. तेव्हा व्याख्यात्याने ऐतिहासिक दृष्टीने बोलावे अशी अपेक्षा कोरेकल एका श्रोत्याकडे व्यक्त करतात. तेव्हा तो उत्साही श्रोता इतिहास हा शब्द कानावर पडताच, कोरेकलांना सांगतो की मला सगळा इतिहास माहित आहे. बाजी, शिवाजी, संभाजी कोण होते ते मला ठाऊक आहे, तेव्हा ते ऐकण्याची मला आवड नाही. बाजारात कांदे गाजराची गर्दी व्हावी तशी गर्दी इथे दिसली तेव्हा भाज्याचा लिलाव आहे की काय ? म्हणून इथे आलो. असे तो श्रोता कोरेकलांना सांगतो. त्यावरची कोरेकलांची प्रतिक्रिया वाचण्यासारखी आहे ते म्हणतात-

येण्याची जव कारणे समजली अैस्क्रीमसा जाहलो ।।

वकील व्याख्यात्यांच्या भाषणाची टर उडवताना कोरेकल म्हणतात-

त्याच्या भाषणि शब्द तेच फिरूनी ते कायद्याचे निघे
शैली, ऐट तदीय मी टकमका व्यामूढचित्ते बघे ।
चालू दे वकिला ! समन्स तव, ते हायकोर्ट वा केसही
डोके होऊनि पाय चालत जरी तोंडास ये फेसही

काव्याचे जरि कीस मी तुज पुढे पाडू तरी फीस ती

देऊ कोठुनि, दूषवू उलट का ? ही काव्य देवी सती।''

व्याख्यानाला एक डॉक्टर येतो तेव्हा कोरेकलांना खूप आनंद होतो. पण तो डॉक्टर व्याख्यान ऐकण्यास आला नसून रोगी तपासण्यास आलेला आहे असे कळते तेव्हा '' साऱ्या कवीनो पळा'' असे म्हणून कोरेकल हास्याची निर्मिती करतात.

नर्तन अथवा नृत्य हा तसा गंभीर विषय, पण त्यालाही कोरेकल हास्याचा स्पर्श घडवितात. पूर्वी नाचणे हे रानटीपणाचे लक्षण होते, पण आता ते तसे राहिले नाही. कारण कोरेकल म्हणतात-

राजाही आजि खुद्द ''नर्तन'' करी बॉलांत राणी निशी।

तेव्हा चालही रीतिशीर ठरली, चालेल दाही दिशी ॥

राजा तशी प्रजा या न्यायाने -

आताही शिरलीच ना हळूहळू ही चाल आम्हामधी।

झालेही भजनांत '' नर्तन'' सुरू येते दिसोनी कधी ॥

वृत्तवेडा कवी, यमक वेडा कवी यांची वर्णनेही कोरेकलांनी केलेली आहेत. 'नावाची नवलाई' आणि 'नावाचे नामदारक' या कवितातही विरोधाभासातून अतिशयोक्ति साधलेली दिसते.

जन्म सावित्रिचा तारा।

लग्नारात्री मेला नवरा ॥

किंवा-

नाव सांगे बलभीमदादा।

कळशी नेता आपटे दहादा ॥

" नाव" या शब्दावर निरनिराळ्या कोट्या करीत वरवर गंभीरपणे चित्रण करणाऱ्या कोरेकलांच्या दोन कविताही अशाच हास्यपूर्ण आहेत.

नाव नाजुक बकुळा वदते
द्रोणासह जी पोळी गिळते ॥
नाव सांगे अन्नपूर्णा ।
एक शीतहि ना दे कोणा ॥

जशी बायकांची तशी पुरुषांची नावेही कोरेकलांच्या तडाख्यातून सुटलेली नाहीत.

नाव आहे अर्जुनराव
झुरळ पाहाता घेतो धाव ॥
"अमृतराव नाव ज्याचे
श्राद्ध होते काल त्याचे ॥

आपल्या स्वतःलाही ते या टवाळीतून वगळत नाहीत, ते म्हणतात-

" नाव जैसे यशवंत
पदोपदी अपयश येत "

कोरेकलांनी स्वतःच्या नावाचीच नव्हे तर स्वतःच्या काही कृत्यांचीही अशीच टर उडविली आहे. त्यांची " माझे अश्वारोहण " ही कविता पाहण्यासारखी आहे. एके दिवशी अश्वारोहण करताना कविता आठवली आणि ती तात्काळ लिहून काढण्याच्या नादात आपण घोड्यावरून खड्डयात करो पडलो याचे मोठे प्रांजळ निवेदन कोरेकलांनी या कवितेत केले आहे.

"कर्तन" म्हणजे कटींग हा कोरेकलांनी विनोदातून मांडलेला आणखी एक विषय. त्या विषयी कोरेकल म्हणतात-

पूर्वी "कर्तन" हीन कार्य ठरले होते अजी श्रेष्ठ ते।"

कारण पूर्वी कटिंग अशुभ समजली जाई, त्यासाठी व्यतिपात, एकादशी अशा तिथ्या पाहून नाव्ह्यापुढे बसत, आता मात्र-

जाती "कर्तन" मंदिरात कुणिही नाही तिथीची मिती।

मोठ्याशा शहरी "सलून" उघडे केव्हाहि ते राहती"॥

या केश कर्तनासोबतच कपडे कापणारा शिंपीही कोरेकलांच्या विनोदी दृष्टीतून सुटला नाही. पूर्वी एकच शिंपी सगळे कपडे शिवी, तर आता मात्र-

आता फक्त गळाच कापित असे, तैसैच कोणी खिसे।

ऐसे कातरिती यदीय म्हणवी, हा हातखंडा असे॥

जगामधील जे अनिष्ट आहे त्याची अशी टिंगल कोरेकल उडवितात.

लेखनाच्यामध्ये लेखनाच्या ओळीला चिन्हे कशी सतावून सोडतात व सरळ जाऊ देत नाहीत, त्याच्यावर कोरेकलांनी कल्पनेच्या भराऱ्या मारल्या. त्यातून जशी कोरेकलांची विनोदबुद्धी प्रगट होते तसेच त्यांचे भाषा नैपुण्य आणि सूक्ष्मबुद्धीही दिसते. स्वल्पविरामाबंधी ते म्हणतात-

आल्या स्वल्पविराम ओळ नच ती चाले तरो चालवी।

घोट्याला पिरगाळुनी लवतरी वाक्यारा तो थांबवी॥"

अर्धविराम तर घोट्यापासून गुडघा तोडून वाक्याला अर्धमेलाच करतो आणि या दोघांना चकवून एखादे वाक्य पुढे गेलेच तर शेवटी ते पूर्णविरामाच्या खड्यात तरी निश्चितच जाऊन पडते, असे कोरेकल म्हणतात. तेव्हा त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाचे प्रत्यंतर येते. " प्रश्नाचा कोयता", उद्गाराचा भाला, आणि " कंसा" चा "आ" हे सगळे जणू शब्दांना मारावयासच टपलेले असतात. पण यांनी मारूनही शब्द जिवंतच दिसतो. हे शब्दाचे मोठेपण कोरेकल शेवटी स्पष्ट करतात तेव्हा आपोआपच त्यांच्या या कल्पनेला दाद मिळून जाते.

कोरेकल बडोद्याला गेले असताना तेथील उन्हाळा पाहून ते म्हणतात-

देहासवे या स्थलि चित्त भाजे
बघोनि उष्मा जणू अग्नि लाजे ।

इतर ठिकाणचा उन्हाळा फक्त शरीरच भाजून काढतो, तर या विशुष्क देशातील उन्हाळा मात्र अंतःकरणही भाजून काढतो आणि त्यामुळेच अग्नी ही लाजतो असे म्हणून बडोद्याच्या या उन्हाळ्यामुळे येणाऱ्या घामाचे वर्णन करताना ते म्हणतात,

जे रोमारोमातुनि येत पाणी
नळातही ये न तसे दिसोनी ॥

विनोद साधण्याच्या प्रसंग, व्यक्ती व स्वभाव या तीन तऱ्हा असतात. कोरेकलांच्या कवितेत या सर्व तऱ्हा आढळून येतात.

"मन्याबापू" आणि "बंडूनाना" ही कोरेकलांनी रंगवलेली व्यक्तिचित्रे आहेत. " उपाध्याय" हे स्वभावचित्र आहे. या उपाध्यायास

यजमानरूपी अभक्ष्य शोधण्यात झोप वा जेवणाचीही शुद्ध नसते. कोळ्याने जाळे टाकून बसावे तसा हा सदैव स्टेशनवर किंवा यात्रेत जाळे टाकून बसलेला असतो आणि यजमान भेटला रे भेटला की " मी तुझा उपाध्याय" असे त्याला नानापरीने पटवून देण्यात याची सर्व बुद्धी खर्ची पडते. या उपाध्यायाला कंटाळून मी हे विश्व सोडून स्वर्गात जावयास तयार आहे इतकी धास्ती कवीने उपाध्यायाची घेतलेली आहे.

उपाध्याय परवडला पण त्या पेक्षा अधिक त्रासदायक प्राणी म्हणजे वकिलबंधू

पिळुनि काढाया जग जया अशील। हेच ज्याचे कर्तव्य, धर्म, शील ॥

असा हा वकील आणि त्याच्या वकिली कारवाया याचे मोठे मजेशीर वर्णन कोरेकल करतात. वकील हा सर्वज्ञानी असतो आणि त्यामुळे

सभासद हा, नेता व कार्यदक्ष। कुठे श्रोता, अध्यक्ष, उपाध्यक्ष ॥

वकिल" म्हणजे तो काय काय नाही। कुठेकाही, तर कुठे सर्व काही

अशा प्रकारे विनोद निर्मितीतील प्रसंग, व्यक्ती आणि स्वभाव या तीनही तऱ्हांचा उत्तम मेळ कोरेकलांच्या विनोदी कवितांत आढळून येतो. शब्दचमत्कृती साधण्याची कोरेकलांच्या कवी स्वभावाला उपजत आवड आहे. त्यांच्या विनोदी कविता शिवाय इतरही अशी शद्धचमत्कृतीची उदाहरणे आढळतात.

जीवनातील विसंगती टिपून आपल्या कवितेतून ती साकार करण्याचे सामर्थ्य त्यांच्या जवळ होते तसेच जीवनाकडे निव्वळ कोरड्या गंभीरपणेच नव्हे तर निखळ हसऱ्या दृष्टीने पाहण्याचेही सामर्थ्य कोरेकलांच्या ठिकाणी

होते. विडंबन काव्याला आवश्यक असणारी सूक्ष्म व तीक्ष्ण काकदृष्टीही कोरेकलांना लाभलेली होती आणि कोट्या व श्लेष साधण्यास आवश्यक असणारे भाषाप्रभुत्वही त्यांच्याजवळ होते. पण जीवनाकडे केवळ विनोदी दृष्टीने पाहाणे कोरेकलांना मान्य नव्हते. त्यामुळे त्यांच्या विनोदी कवितातही कधी उपदेश, कधी नीती, कधी तत्वज्ञान, तर कधी करुणरस मिसळलेला दिसतो.

मराठीतील प्रमुख विनोदी कवीच्या पंक्तीत कोरेकलांना बसवता येण्याइतकी त्यांच्या विनोदी कवितांची संख्या जास्त नसली तरी या तत्वज्ञानप्रचुर आणि गंभीर, तसेच जीवनात दुःखेच जास्त भोगलेल्या कवीच्या निर्मळ अंतःकरणाचे व जीवनाकडे पहाण्याच्या त्यांच्या निकोप दृष्टीचे प्रत्यंतर या विनोदी कवितामधून घडते.

उपदेश आणि नीतीपर कविता पाहू जाता असे दिसते की, कवितेचे नीती आणि उपदेशपर होण्यामध्ये पुष्कळशी कवीची मनोवृत्तीही कारणीभूत ठरते. ज्या कवीची वृत्ती प्रौढ आणि गंभीर असते, हृदयात करुणा भरलेली असते आणि बुद्धीत तत्वज्ञानाचे ठाण मांडलेले असते व ज्या कवीला आत्मानुभूतीच्या प्रकटीकरणात फारसा रस नसतो अशा कवीची कविता प्राधान्याने तत्वज्ञान, उपदेश आणि नीती हेच विषय प्रकटीकरणासाठी निवडत असते असे म्हणता येईल.

यशवंत कोरेकलांची वृत्ती नेमकी अशीच होती त्यामुळे त्यांच्या काव्यात तत्वज्ञानाला प्राधान्य आहे. त्यांची निसर्ग कविताही शेवटी तत्वज्ञानप्रधान बनते. त्याच न्यायाने निखळ उपदेश अथवा नीतीबोध करणाऱ्या कविताही त्यांच्या लेखनात पुष्कळच आढळतात.

कोरेकलांच्या अशा उपदेशपर अथवा नीतीपर कवितांची वर्गवारी केली तर मानवाविषयी करुणा वाटून त्याला काही समजावून सांगणे, जीवनात काही मूल्ये जपावयास हवीत असा उपदेश करणे, जीवनाची नश्वरता समजावून सांगणे, जीवनातील दुःखाचे करुणाशील चित्रण करणे. असे विविध विषय आढळून येतात.

मानवाविषयी करुणा वाटून कोरेकल अनेकदा मानवाला संबोधून अनेक प्रकारचा उपदेश करतात.

कशास बसशी ? असा सतत खिन्न का होऊनी ?

तुला सुखविण्या पहा झटत विश्व रात्रंदिनी ॥

असे म्हणून कोरेकल ईश्वराने दिलेले आयुष्य व्यर्थ घालवू नकोस असा उपदेश मनुष्याला करतात. या आयुष्याचा उपयोग मनुष्याने कसा करावा ते सांगतात कोरेकल म्हणतात-

महत्कृति अशी करी स्मृति तुझी जगी राहू दे ।

सकौतुक विलोकने सतत विश्व डोलो गुदे ॥

जणूकाही मोरोपंतांचाच अनुवाद करीत कोरेकल मानवाला सांगतात की -

कृतांत हितकांक्षिणी! टपतसे जरा सर्वदा

तेव्हा अशा या आयुष्यात -

सदैव जरि राहशी जनहितास तू जागुन ।

तरीच जग या जगी सफल ही तुझे जीवन ॥

कोरेकलांनी मानवाची व्याख्या मोठी लक्षणीय केलेली आहे.

सतत मनन करण्याचा आहे ज्याचा स्वभाव मानव तो ॥
सदस्तु जाणूनीया जो का इतरे जनास जाणवतो ॥

असा हा मानव मानस सरोवराचा राजहंस आहे. आणि नराचा नारायण होण्याची संधी मानवाला आहे असे कोरेकल सांगतात व त्याला उपदेश करताना म्हणतात-

नरतनुच्या नौकेला सगुणोपासन सुकाणु लावावे ।
सज्जन संग समीरे सहज सुलभसे सुमार्ग साधावे ॥

असे वागणारा माणूसच मानव या पदवीस प्राप्त होतो. असे त्यांचे मत दिसते. या माणसाने लोभ व मोह सोडला पाहिजे. मोह लोभ कसा असतो तर -

'' पापाचे कटुबीज लोभ असतो स्वार्थान आणी मनी '' ।

हा स्वार्थ सोडला तर परमार्थाचा मार्ग मोकळा होतो असे कोरेकल म्हणतात. मानवी जीवन म्हणजे '' चार चांदण्याच्या रात्री '' असे म्हणणारे कोरेकल या चार रात्रीचे अतिशय भावपूर्ण आणि त्या सोबतच तत्वज्ञानयुक्त असे वर्णन करताना दिसतात. हे सर्व जीवन नश्वर आहे खोटे आहे. मग खरे काय आहे ? याचेही उत्तर देणे अवश्यक आहे कोरेकल अनेक कवितामधून हे उत्तर देतात.

छातीला जो मनुज अपुला हात लावोनि बोले ।
हा ''मी '' हा ! हा ! किति तरि खुळा निश्चयानेहि डोले ॥

आपण ज्याला '' मी'' म्हणतो ते म्हणजे परमात्म्याचेच एक रूप आहे असे सांगून कोरेकल हा परमात्मा सर्वत्र आहे असे मानतात. ''कुठे नसशी तू'' या कवितेत ते म्हणतात -

कुठे बघु तरी तुला ? मनि असे चुकूनी नये ।
कुठे नसशी तू बरे ? पुसत तोच उल्हास ये ॥

मानवी जीवनातील दुःखाने कवी आणि विचारवंत या सर्वांना सारखेच आकर्षित केलेले दिसते. इंग्रजी कवी शेले म्हणतो त्या प्रमाणे -
" दुःखाची गाणी गाणे माणसाला नेहमीच अधिक आवडत आले आहे "

संत तुकाराम महाराज देखील, " सुख पहाता जवा पाडे, दुःख पर्वता येवढे " असे जीवनातील दुःखाचे अधिक्य वर्णन करून सांगतात- आपल्या काव्यातून आत्मविष्कारापेक्षा तत्वविचार मांडणाऱ्या व त्यातून काही उपदेश करू पहाणाऱ्या कवीला तर जीवनातील हे दुःख अधिकच साह्यकारी ठरत असते. कारण ते दुःख त्याला उपदेश करण्यासाठी निमित्तभूत ठरत असते. कोरेकलांच्या कवितेतही जीवनातील हे दुःख सांगण्याच्या निमित्ताने अनेक ठिकाणी माणसाला उपदेश केलेला आढळतो.

जीवन हे भवितव्यतेवर आधारित आहे. देव देतो तसे येथे जीवन मिळते हे कोरेकलांचे आवडते मत आहे. त्याला अनुसरून " होणार ते होऊ दे" या कवितेत ते म्हणतात-

गेले, जाईल, त्यात दुःख कसले ? जाणार ते जाऊ दे ॥
तू राहोनि उगा सदा बघत जा, होणार ते होऊ दे ॥
दैन्याचे जग, येथ दैन्य पिकते, दीनास ते पावते ।
येथे नीहच काही शाश्वत असे, दृष्टीत जे मावते ॥"

या दुःखाचे मूळ कारण म्हणून कोरेकल विषयवासनेकडेच बोट दाखवितात. या विषयवासनेच्या पाशातून सुटावयाचे तर एकटी गुरुकृपाच उपयोगी पडते म्हणून गुरुकडेच हात पसरून कोरेकल मागणी मागतात-

स्मृति नच जगताची चित्ति माझ्या असावी

तवपदरज लाभो । हीच इच्छा वसावी ॥

कारण त्यांच्यामते " व्यर्थ जगत नाशिवंत एकचि सत्य प्रभू आमुचा". ईश्वराने मानवाला जन्मासोबतच बुद्धीही दिली आहे आणि ही बुद्धी त्याने दुसऱ्याचे हृदय जाणून घ्यावे म्हणून दिली आहे. परक्याचे दुःख जाणून घ्यायला स्वतःचे हृदय प्रेमाने भरलेले असेल पाहिजे, कारण या दुःखालाही मानवी जीवनात काही अर्थ असतो.

कुंतीने ईश्वराचे सतत स्मरण व्हावे म्हणून मला दुःख दे असे मागणे कृष्णाजवळ मागितल्याची आख्यायिका प्रसिद्धच आहे. कोरेकलांनाही दुःखाचे हे रूप जाणवलेले दिसते. " भाग्ये भोगावे अविरत मग दुःखाते" या शब्दात कोरेकल दुःखाला भाग्य म्हणतात. कोरेकलंना जीवनात सर्वत्र दुःखच दिसते असे मात्र नाही. जीवन ही सुखदुःखाने गुंफलेली माळ आहे, हे कोरेकलांना ठाऊक आहे. या सुखदुःखाच्या जीवनमालेत-

निरूद्योगी सदा रोगी। सदुद्योगी सुखा भोगी।

हे दुःखमय जीवन कसे जगावे त्याचे मार्गदर्शन आपल्या वाचकांना करीत असताना कोरेकल सांगतात -

दुःखाने जे हृदय भरते ते रिते व्हावयाला।

तत्वज्ञाना-मधिल गढुनी घालवावे वयाला ॥

असे म्हणून कोरेकलांनी आपले स्वतःचे दुःखी आयुष्य तत्व विचारात घालविलेले दिसते. अशा प्रकारे जीवनातील दुःखाचे दर्शन घडवीत करूणापूर्ण हृदयाने इतरांची दुःखे जाणून घेत कोरेकल त्या दुःखाचेच एक तत्वज्ञान बनवितात आणि आपल्या काव्यातून तेच तत्वज्ञान सांगतात.

जन्माच्या या टोकापासून मृत्यूच्या त्या टोकापर्यंत पसरलेले मानवी जीवीत, त्यातील सुख आणि त्याहीपेक्षा दुःख, मनुष्याचे ध्येय आणि इच्छ, अधिकार आणि कर्तव्य, स्वार्थ आणि परमार्थ, पाप आणि पुण्य या विविध गोष्टीचा कोरेकलांच्या कवितांमधून विचार झालेला दिसतो. दुःख ही टाळावयाची गोष्ट नसून तेही एक भाग्यच होय, हा कोरेकलांचा विचार भारतीय तत्वज्ञानाच्या परंपरेत बसणारा आहे. पाप पुण्याच्या त्यांच्या कल्पना केवळ धर्माधिष्ठीत नसून त्यामागे मानवी जीवीताच्या दर्शनाचा प्रत्यय येतो. स्वार्थाचा धिक्कार आणि परोपकाराचा स्वीकार यातून कोरेकलांची विशाल मनोवृत्ती प्रत्ययाला येते. कोरेकलांचे जीवनचरित्र आणि त्यांची कविता हे दोन्ही एकमेकात मिसळून गेलेले दिसतात. म्हणूनच जीवनात प्रौढ, विचारी, तत्वचिंतक आणि परोपकारी असलेले कोरेकल त्यांच्या कवितेतूनही तसेच होते असे दिसते.

## यशवंत कोरेकल : दुसरे मोरोपंत -

मराठी काव्य विचारात वृत्ताचे विवेचन आणि त्यांची उदाहरणे देणारे लेखक हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच निघतील. जुन्या कवी पैकी मोरोपंत आणि रामजोशी आणि आधुनिक काळात परशुराम तात्या गोडबोले व माधवराव पटवर्धन यांनी संस्कृत मराठी वृत्तांचे विवेचन केलेले आहे. कै. वि. का. राजवाडे यांचाही केवळ प्राकृत वृत्तांचे विवेचन करणारा

एक प्रदीर्घ लेख आहे. माधवराव पटवर्धन यांचा " छंदोरचना" हा ग्रंथ वृत्तविषयक विचारांच्या बाबतीत त्यांच्या स्वतंत्र बुद्धीची साक्ष देणारा असला तरी, आपण विवेचिलेल्या सर्वच वृत्तांमध्ये काव्यरचना करण्याचे काही माधवरावांच्या हातून घडले नाही. राजवाडे यांचा लेख तर निव्वळ शास्त्रीय माहिती देणारा आणि त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे अनेक वादग्रस्त विधानांनी भरलेला आहे. परशुरामतात्या गोडबोले आणि रामजोशी यांची रचना अनेक वृत्तामधून उपलब्ध होत असली तरी त्यांनी न वापरलेल्या वृत्तांची संख्याही खूपच मोठी आहे. उपलब्ध संस्कृत-प्राकृत वृत्तापैकी बहुसंख्य वृत्तांचा वापर आपल्या काव्यातून करणारे एकच कवी आहेत आणि ते म्हणजे मोरोपंत.

मोरोपंतानी जी असंख्य काव्य रचना केली तिच्यात त्यांनी संस्कृतातील बहुतेक प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध वृत्तामध्ये रचना केलेली दिसते. त्यांचे पहिलेच काव्य " कुशलवोपाख्यान" हे ५०६ श्लोकांचे आहे आणि त्यात २८ गणवृत्ते ३ अर्धसमवृते, ४ मात्रावृत्ते, दोहा हे एक हिन्दी वृत्त आणि अनुष्टुप् छंद इतक्याचा वापर केलेला आहे.

मात्र मोरोपंतानीही उपलब्ध सर्वच्या सर्व वृत्तामध्ये रचना केली असे म्हणता येत नाही. तसेच त्यांना जरी " वृत्तप्रभू " म्हटले जात असले तरी त्यांच्या काव्यात वृत्तांकरीता शब्दाची असह्य ओढाताण दिसून येते.

या पार्श्वभूमीवर यशवंतराव कोरेकलांना " पुष्पपाकळ्या" या काव्य संग्रहातील प्रयास पाहिला म्हणजे तो त्यांनी जवळपास परिपूर्णतेला नेला आहे असे म्हणता येते. मोरोपंतानी सुरूवातीला अनेक वृत्तांमधून रचना करून पाहिली तरी पुढे पुढे काही विशिष्ट वृत्तेच वापरली. विशेषत:

आपले एकेक काव्य सलग एका वृत्तातच लिहावे असे धोरण त्यांनी ठेविले. आणि मुख्य म्हणजे आर्यांचा त्यांनी भरपूर वापर केला. त्यामुळे त्यांना '' वृत्तप्रभू'' पेक्षाही '' आर्यापती'' हे नाव अधिक शोभून दिसते. मोरोपंताच्या हातून पूर्ण न झालेले हे काम करून घेण्यासाठीच नियतीने जणू कोरेकलांची योजना केलेली असावी. कोरेकलांनी उपलब्ध असलेल्या १८६ वृत्तांत कविता केल्या आहेत. तशी त्यांनी दिलेली वृत्तांची नामसंख्या २३६ आहे. परंतु काही वृत्तांची लक्षणे तीच असून नावे मात्र अनेक आहेत. त्यांची संख्या ५० आहे. या समान लक्षणाच्या परंतु भिन्ननामांच्या वृत्तातही कोरेकलांनी कविता केल्या आहेत. अशा रीतीने कोरेकलांच्या रूपाने मराठीत जणू दुसरे मोरोपंतच अवतरले. त्यांनी एकूण एक उपलब्ध वृत्तामध्ये आपली काव्यरचना केलेली आहे.

## वृत्तसम्राट कोरेकल :-

कोरेकलांच्या अंगी जिद्द, चिकाटी, उत्साह हे गुण फार मोठ्या प्रमाणात होते. या जोडीलाच पांडित्य आणि बुद्धिमत्ता यांचा उपयोग करून कोरेकलांनी सर्व वृत्तामध्ये कविता लिहून दाखविल्या. त्यात जसे केवळ एक अक्षराचे ''श्री'' हे वृत्त आहे, तसेच तीस अक्षरांचे ''अर्णदंडक'' हेही वृत्त आहे. विषमवृत्तात काव्यरचना करणे ही एक अवघडच गोष्ट. कारण प्रत्येक चरण वेगळ्या वृत्ताचा योजावा लागतो. पण कोरेकलांनी हेही कार्य सहजपणे करून दाखविले आहे. घनाक्षरी हे प्राकृतवृत्त तर रचनेला आणखीनच कठीण. कारण त्यात १६ चरण किंवा चार पद असतात. त्यातील प्रत्येक पद हा चार चरणांचा असून त्यातील पहिली तीन चरणे आठ अक्षरांची व तीही १२ मात्राचीच असली पाहिजेत असा दंडक असतो. या शिवाय या तीनही चरणांच्या शेवटी यमक साधावे

लागते. या शिवाय चौथे चरण सात अक्षरांचे व अकरा मात्राचेच असावे लागते. आणखी एक बाब म्हणजे पादातल्या चौथ्या चौथ्या अक्षराचेही यमक साधावे लागते. कोरेकलांच्या प्रतिभेने व विद्वत्तेने या सगळ्या नियमांचे पालन करून एक प्रासादिक कविता रचली आहे. तिचे केवळ दोन पाद जरी पाहिले तरी कोरेकलांच्या या कामगिरीची कल्पना येते.

बा ! जगदीश महेशा ! '' सात्विकचि सदावेशा ।
देऊनि पुरवी आशा '' दीनदैन्य हरावे'' ॥
विसरवी भेदवैर '' समता विचरो स्वैर'' ।
सतत असा दे धीर ॥ महत्कार्य घडावे ।''

कोरेकलांनी सर्वात जास्त रचना शार्दूलविक्रिडित या वृत्तात केली आहे. त्यांच्या एकूण प्रकाशित ६११ कवितांपैकी २२४ कविता म्हणजे सुमारे एक तृतांयांस कविता या वृत्तांत आहेत. वनराज शार्दूलाची चाल धीर गंभीर, प्रौढ आणि रूबाबदार असते. तशीच या वृत्ताची लयही असते. म्हणूनच त्याला शार्दूलविक्रिडित हे नावे पडले आहे. कोरेकलांच्या काव्यातील विषय व विचार प्रामुख्याने गंभीर आणि प्रौढ आहेत त्यात आत्मज्ञानातून साकार झालेल्या तत्वज्ञानाचा मोठा तेजस्वी अविष्कार आढळून येतो. अशा प्रकारच्या विषयाला शार्दुलविक्रिडित हेच वृत्त योग्य न्याय देऊ शकले असते तेव्हा कोरेकलांनी आपल्या बहुसंख्य कवितांसाठी हे वृत्त योजण्यात मोठे औचित्य दाखविले आहे असे म्हणावे लागेल. शार्दूलविक्रीडितच्या खालोखाल कोरेकलांनी पृथ्वी आणि मंदाक्रांता ही वृत्ते वापरली असून कवितांची संख्या अनुक्रमे ४४ व २२ आहे. पृथ्वी हे १७ अक्षरी दीर्घ वृत्त असून त्याचीही योजना गंभीर विषयाच्या अभिव्यक्तीसाठी प्रायः केली जाते. मंदाक्रांता हे ही १७ च अक्षरी वृत्त असले तरी ते प्रायः करूण आणि शांत या रसांच्या संदर्भात वापरले

जाते. कोरेकलांच्या एकूणच कवितेत कारूण्याचा एक अस्फुट प्रवाह आहे आणि सर्व कवितेवर शांततेची सुखद सावली पसरली आहे. ती पाहाता या वृत्ताची योजना करण्यातले औचित्य विशेष लक्षणीय ठरते. त्यांची ही वृत्तविषयक कामगिरी मुळातूनच पहावयास हवी. त्यांनी २३८ वृत्तामध्ये एकेक कविता दिली आहे व त्याची सूचीही दिली आहे. त्यावरून त्यांच्या वृत्तविषयक कामगिरीची स्पष्ट कल्पना येते.

वृत्ताशिवाय कोरेकलांनी काही लोकप्रिय चालीचाहि आपल्या काव्यरचनेत उपयोग करून घेतला आहे. चालीचा संबंध प्रायः संगीताशी आणि रागदारीशी असतो. कोरेकल स्वतः संगीतज्ञ व उत्तम पेटीवादक होते तेव्हा रागरागिण्यावर आधारित आणि लोक संगीतातून चालत आलेल्या विविध चालींचा त्यांनी समर्पक उपयोग करून घ्यावा यात काहीच नवल नाही. कोरेकलांचा उर्दू कवितेशी दाट परिचय होता कारण त्यांच्या काव्यलेखनाची सुरूवातच उर्दू कवितांनी झाली होती. या कवितेतील ' गझल' हा रचना प्रकारही कोरेकलांनी त्यांच्या तिसऱ्या काव्यसंग्रहात यशस्वीपणे हाताळलेला दिसतो.

मराठीत सर्व वृत्तांची अशी सोदाहरण प्रात्यक्षिके देणारा एकही कवी नाही. कोरेकलांचे अनन्यत्व ठरविताना जसा त्यांच्या काव्याचे विषय, त्यांची अभिव्यक्ती व त्यातून दिसणारे त्यांचे व्यक्तित्व त्यांच्या संदर्भात विचार केला तसाच वृत्तरचनेच्या संदर्भात करावयास हवा, कोरेकलांना ' वृत्तसम्राट' ही पदवी मिळावी अशीच त्यांची ही वृत्त विषयक कामगिरी अजोड आणि एकमेवाद्वितीय आहे.

येथ पर्यंत आपण यशवंत कोरेकल यांच्या जीवनाविषयी आणि त्यांच्या वाङ्मयीन कामगिरी विषयी सविस्तर माहिती करून घेतली. जीवनात आलेल्या अनेक संकटाना आणि हाल आपेष्टांना तोंड देऊनही

जीवनाच्या माथ्यावर पाय देऊन ताठपणे उभा राहाणारा हा माणूस होता. त्यांच्या काव्याकडे निखळ रसिक दृष्टिने बघीतले तर काव्याची सारी आंगोपांगे न्याहाळून त्यांच्या आपल्या काव्यात यशस्वीपणे अविष्कार करणारा हा कवी किती मोठ्या दर्जाचा होता हे लक्षात येते. ज्ञानेश्वरांनी एका ठिकाणी म्हटलं आहे-

वाचे बरवे कवित्व । कवित्वी बरवे रसिकत्व ।

रसिकत्वी परतत्व । स्पर्शु जैसा ॥

म्हणजे उत्तम काव्य तेच होय की ज्याला परतत्वाचा म्हणजेच अध्यात्माचा स्पर्श झालेला असतो. कोरेकलांच्या काव्याला हा परतत्वाचा सुंगधी स्पर्श झालेला होता. त्यामुळे त्याही दृष्टीने त्यांचे काव्य उत्तम काव्य ठरते. भाग्यनगरीच्या भाग्याने येथे जन्मलेल्या कोरेकलांना योग्य ते मानसन्मान व प्रतिष्ठा मिळाली, त्यात कविवर्य काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद, रहस्यज्ञ, या पदव्या मिळाल्या. या काळातील समाजातील प्रतिष्ठिताकडून 'मानपत्र' मिळाले. त्यात श्री जी. बी. जोशी, एम. एच. मिश्र, जी. बी. हरवाळकर, शेषराव पिलखाने, त्रिबंकराव कामाठी, व्ही. बी. धनाश्री, एम. आर परळीकर, आर. डी. जोशी, एन. वाय. बक्षी यांची नावे आहेत. दुसरे मान पत्र खडाष्टक मंडळाचे असून ते र.मु. जोशी, वि. कृ. भावे यांनी दिलेले आहे. तसेच शंकरराव सदावर्ते, श्री. कृ. पांडव प्रभृति, यांनीही मानपत्र दिले आहे. त्यांच्या काव्य व गद्यसंग्रहाला अनेकांचे अभिप्राय प्राप्त झाले. त्यात विष्णुशास्त्री बापट (वेद विद्वेदांतवाग्व्यापृत विद्वर्य शास्त्रसुधाकर आचार्यभक्त पंडित, संस्थापक आचार्यकुल पुणे) श्री मुकुंदजी (श्रीकाशीपण्डित सभायाः सहकारी सभापति विद्वज्जनमानसहंस, काशीपण्डित सभा) तसेच विद्वमान्य वेदान्तभूषण वेदान्तवागीश महामहोपाध्याय श्री श्रीधरशास्त्री पाठक

(सरस्वती पाठशाळा) हे कांही प्रमुख आहेत. तसेच त्यांच्या ग्रंथाना अनेक मान्यवरांनी प्रस्तावना लिहिल्या. त्यात र. मु. जोशी, साहित्यसम्राट न. चि. केळकर, भारताचार्य चि. वि. वैद्य, सुप्रसिद्ध समीक्षक श्री. नी. चापेकर, रंगाचार्य रेड्डी शास्त्री व प्रभुदास श्री अप्पासाहेब देशपांडे हे काही प्रमुख विद्वान होत.

कोरेकलांनी मराठीतूनच नव्हे तर उर्दू आणि हिन्दीतून लेखन केले. ''दीवान'' हा कठीण वाङ्मयप्रकार यशस्वीपणे हाताळून त्यांनी उर्दू शायरांकडून पसंतीची दाद मिळविली.

कोरेकल सकलकला कोविद होते. संगीत-गायन, वादन, चित्रकला, फोटोग्राफी आणि पेंटिंग, कातरकाम आणि सुक्ष्मलेखन यात त्यांनी नैपुण्य मिळविले होते. तसेच ते प्रभावी वक्ते होते. पुणे, नाशिक येथे '' वसंतव्याख्यानमालेत'' त्यांनी व्याख्याने गाजविली. उस्मानिया विद्यापीठात व हैदराबादेत इतरत्रही त्यांची व्याख्याने गाजली. त्यांच्या पेटीवादनाचे जाहीर कार्यक्रम झाले. ते कीर्तन व प्रवचन करीत. अनेक सभा संमेलनाचे ते अध्यक्ष असत.

कोरेकलांचे सद्गुरु श्री मार्तण्डमाणिकप्रभू यांनी स्वतः त्यांचा ''पार्वतीपते हर हर महादेव'' या नामोच्चारात मानवटीसह बाण, सोवळे (पितांबर) व श्री प्रभुंच्या सुवर्ण प्रतिकांची टोपी देऊन त्यांचा सन्मान केला होता.

परंतु नंतरच्या काळात मात्र हे तेजाने झळाळलेले माणिक इतिहासाच्या धुराळ्याने निस्तेज झालेले दिसते. हे माणिक घासून पुसून पुन्हा लोकांसमोर आणावे, त्याच्या तेजाच्या शलाका रसिकांच्या नजरेस

आणाव्या या हेतूने कोरेकलांचे जीवन आणि त्यांचे काव्य यांच्या सोबतच त्यांच्या इतर गुणांचेही दर्शन वाचकांना घडवावे यासाठी हा प्रपंच केला आहे, तो वाचकांनी गोड मानून घ्यावा व ' न्यून ते पुरते' करून घ्यावे. श्री माणिकप्रभूंच्या आशिर्वादाने प्रस्तुत ग्रंथ सर्व जनतेस प्रसृत व्हावा ही प्रभूंचे चरणी नम्र विनंती आहे.

कोरेकलांच्याच शब्दात सांगावयाचे म्हणजे-

''या दीनाची ही वाक्सेवा प्रभुवर परतर सुखकर देवा।

घ्यावी........''

❁ ❁ ❁

## एक भेट : श्री अप्पासाहेब देशपांडे यांच्याशी

प्रश्न : यशवंतरावांचे मूळ गाव कोणते ? व त्यांचा तुमच्याशी संबंध कसा आला ?

उत्तर : यशवंतराव मूळ कर्नाटकातील बिदर जिल्ह्यात औराद जवळील ''कोरेकल'' या गावचे रहाणारे होते. तेथे त्यांची थोडीबहुत शेतीबाडी होती. वडील हे नोकरी करीत असत. ते मोठे ईश्वर भक्त होते. वडील व आई लहानपणीच मृत्यू पावल्यानंतर ते माणिकनगरला आपल्या आत्याकडे काही दिवस रहात. माणिकनगरचे श्री मार्तण्डमाणिकप्रभू हे त्यांचे आतेभाऊ होते. मी कल्याणचा देशपांडे. माझेही वडील लहानपणीच वारल्यामुळे माझेही बालपण माणिकनगरलाच गेले. मी मार्तण्डप्रभूंच्या मुलीचा मुलगा. म्हणजे त्यांचा नातू बाबासाहेब म्हणजे माझे मामा. अशारीतीने यशवंतराव हे माझे नात्यातले होते. माणिकनगरापासूनच आमचा संबंध आला. तो शेवटपर्यंत कायम होता.

प्रश्नः कोरेकलांचे शिक्षण कोठे व कसे झाले ?

उत्तर : यशवंतरावाचे वडील वारल्यानंतर यशवंतराव अनाथ झाले. त्यांचे चुलतभाऊ शेषराव हे हैदराबादेस नोकरीला होते. त्यांनी यशवंतरावांचा सांभाळ केला. यशवंतरावांना जास्त शिक्षण काही लाभले नाही. थोडे बहुतच शिकले आणि अनेक कला ते स्वयंशिक्षक बनूनच शिकले.

प्रश्न : यशवंतराव नोकरी कोठे करीत असत व त्यांची एकंदर परिस्थिती कशी होती ?

उत्तर : शिक्षण तर त्यांना काही जास्त लाभले नाही. त्यांचे चुलतभाऊ असिस्टंट अकाऊंट जनरलच्या पदावर होते पण तेही लवकरच वारले. मग यशवंतरावांना त्याच ऑफीसमध्ये अकाऊंट खात्यामध्ये नोकरी मिळाली. नोकरी शिवाय दुसरे काहीही उत्पन्न त्यांना नव्हते. वास्तविक नोकरी ते केवळ उदरनिर्वाहासाठी म्हणूनच करीत असत. त्यांचे सर्व लक्ष वेगवेगळ्या कला व लेखनातच होते.

प्रश्न : यशवंतरावांची साधारणपणे दिनचार्य काय होती ?

उत्तर: यशवंतराव दररोज पार्थीव पूजा करीत असत. कचेरीतून घरी येताना पुस्तकाची प्रुफे घेऊन येत. ते तपासित. दुरूस्त्या ते स्वतःच करीत. संध्याकाळी दररोज प्रवचन करीत व प्रवचनानंतर भजन करीत असत. त्यांच्या पेटीवादनाचा शिष्यवर्ग बराच मोठा होता. तसेच प्रवचन भजनास काही मंडळी नित्य - नेमाने येत असत. पेटीवादनात ते पारंगत होते. रात्री ते अनेकांना पेटीवादन शिकवीत असत.

प्रश्न : त्यांच्या पेटीवादनातील काही शिष्यांची नावे सांगता येतील काय ?

उत्तर : होय. अनेक होते. त्यात बापू रिठेगल्ली, नारायणराव बक्षी, नारायणराव भैरव, नारायणराव पंत, कल्याणराव जोशी ही काही नावे आठवतात.

नित्यक्रमामध्ये ते पत्नी वारल्यानंतर फक्त सोमवारी संध्याकाळी जेवण करीत असत. सून ही सकेशा विधवा होती. त्यामुळे तिच्या हातचे जेवण त्यांना चालत नसे. दर सोमवारी त्यांची बहिण

हरणेक्का ही संध्याकाळी स्वंयपाक करून देई. जेवण करतांना एकटे केव्हाही जेवत नसत. त्यावेळी हजर असलेल्यांना ते जेवणास उठवीत असत.

प्रश्न : यशवंतराव भजन, पूजन अध्यात्म याकडे कसे वळले ?

उत्तर : त्यांचा माणिकनगर संस्थानाशी नाते संबंध होताच. त्यांचे वडीलही ईश्वरभक्त होते. त्यांची आजी सुंदराबाई आपल्या मुलीकडे माणिकनगरला रहात असे. तेव्हा याना त्या निमित्ताने यशवंतराव बालपणी बरेच दिवस माणिकनगरला राहिले. माणिकनगर संस्थानातील वातावरण, भजन, पूजन, प्रवचन, उत्सव, उपासना यांनी सदैव भरलेले असावयाचे, त्याचाच परिणाम यशवंतरावांवर झाला व ते अध्यात्माकडे वळले. त्यांच्या जीवनातही एकानंतर एक दु:ख आली, म्हणून भजन पूजनात मन रमवीत.

प्रश्न : कोरेकलांच्या दैनंदिनीत माणिकनगरच्या काही ठिकाणच्य माहितीचे उल्लेख आहेत. त्याबद्दल सांगा- उदाहरणार्थ वाडा, गादी, छप्पर.

उत्तर : ''गादी'' गादी ही पूर्वीपासूनच माणिकप्रभूंची आहे. तिला दत्ताची गादी असेही म्हणतात. मार्तण्डप्रभूंनी ही गादी स्थापन केली. छप्पर म्हणजे, श्री मार्तण्डप्रभू रहाण्याचे ठिकाण. त्याला छप्पर असे म्हणतात. अगोदर ती छप्परच होती. नंतर तेथे इमारत झाली पण नाव छप्परच राहिले, व बाबासाहेब रहात होते त्याला वाडा असे म्हणतात. हे मार्तण्डप्रभूंचे चिरंजीव म्हणजे आमचे मामा.

प्रश्न : यशवंतरावांची पुस्तके कोठे छापली जात असत व प्रकाशन कोण करीत होते ?

उत्तर : त्यांचा पहिला कविता संग्रह " काव्य कुसुम कलिका" हा मी पुण्याला छापला व प्रकाशित मीच केला. त्या वेळी हैदराबादला मराठी छापण्याची सोय नव्हती. हैदराबादला मराठी साहित्य सम्मेलन झाल्यानंतर तेथे जी दक्कन लॉ रिपोर्टर प्रेस होती, ती को रटकरांची होती. तेथे मराठी विभाग नव्हता. मीच कोरटकरांना विनंती केली की तुम्ही तुमच्या प्रेसमध्ये मराठी विभाग उघडा व यशवंतरावांची पुस्तके छापा. ही विनंती त्यांनी मान्य केली व यशवंतरावांच्या पुस्तकासाठीच हैदराबादला मराठी विभाग उघडला गेला व त्यांची पुस्तके येथे छापली जाऊ लागली. त्यांच्या पुस्तकांचे प्रकाशन मात्र माणिकनगर संस्थान करीत असे. अशा रीतीने हैदराबादेस प्रथम मराठी प्रेस आणण्यास श्री यशवंतराव कोरेकल हे कारणीभूत आहेत.

प्रश्न : पुस्तके छापण्यासाठी खर्च संस्थान देत होते काय ?

उत्तर: नाही. छापखाण्याचा सर्व खर्च यशवंतराव स्वतः करीत असत. फक्त प्रकाशन माणिकनगर संस्थान करीत असे.

प्रश्न : यशवंतरावांचे त्यावेळच्या हैदराबादेतील इतर साहित्यिकांशी संबंध कसे होते ?

उत्तर: त्यावेळचे साहित्यक म्हणजे र. मु. जोशी, प्रा. भुसारी यांच्याशी त्यांचे जवळचे संबंध होते, पण यशवंतराव लिखाणं, प्रुफ तपासणे, भजन, प्रवचन यात मग्न असल्यामुळे फारसे बाहेर फिरत नसत. त्यांना वेळही मिळत नसे. त्यांचे निजाम संस्थानाशी संबंध चांगले होते. अनेक श्रीमंत कुटुंबाशी त्यांच्या ओळखी होत्या.

प्रश्न : त्या काळातील मुख्य प्रश्न राजकारण व समाजकारणाचा होता. यशवंतरावाचा त्यांच्याशी काही संबंध आला होता काय ?

उत्तर : यशवंतरावांनी राजकारण, समाजकारणात प्रत्यक्ष भाग घेतला नाही, फक्त ते खादी वापरीत व सूत काढीत होते. सरकारी नोकरीत असल्याने त्यांनी राजकारण केले नाही.. राजकारण समाजकारणा पेक्षा त्यांचा ओढा अध्यात्माकडे जास्त होता. त्यामुळे भजन पूजनातच वेळ ते घालवीत असत.

प्रश्न : यशवंतरावांना प्रवासाचा छंद होता काय ?

उत्तर : होय. त्यांनी भरपूर प्रवास केला हा प्रवास करण्यास बहुतेक त्यांचा शिष्यवर्ग कारणीभूत होता. तेच त्यांना घेऊन जात असत. प्रवासातही त्यांनी भरपूर काव्यलेखन केले आहे व तीर्थयात्रा ही भरपूर केल्या.

प्रश्न : यशवंतरावांचे माणिकनगर संस्थानाशी संबंध कशा प्रकारचे होते ?

उत्तर : चांगले होते. ते माणिकनगरला मनात येईल तेव्हा येत व राहू वाटेल तितके दिवस रहात. नोकरीत ऑफीसची माणसे चांगली होती. संबंध चांगले होते. त्यामुळे त्यांच्यावर नोकरीची बंधने नव्हती. माणिकनगरला असले म्हणजे ''श्रीं'' च्या पंक्तीस व आमच्याही पंक्तीस ते बसत असत. ''श्रीं'' च्या पंक्ती या रात्री होत व आमच्यापंक्ती या दुपारी होत असत. तेथे ते सोमवारचे व्रत पाळीत नसत.

प्रश्न : मार्तण्ड माणिकप्रभू नंतर यशवंतरावांना गादीवर येण्याची इच्छा होती काय? किंवा असे काही घाटत होते काय ?त्यांच्या दैनंदिनीत या संबंधी काही सूचक उल्लेख आढळतात, म्हणून विचारतो.

उत्तर : हा फार नाजूक प्रश्न आहे. यशवंतरावांना स्वतःला तरी काही इच्छा नव्हती. मार्तण्डमाणिकप्रभूंनी आपला वारस असा काही

नेमला नव्हता, मार्तण्डप्रभूंच्या मुलीचा मी मुलगा म्हणजे नातू. त्या वेळी मी, यशवंतराव व शंकरप्रभू हे त्या ठिकाणी होतो. मार्तण्डप्रभूंचे देहावसान झाले व शंकररावांना क्रियाकर्म करण्यास सर्वांनीच सांगितले व शंकरप्रभूंनी हा भार सांभाळून क्रियाकर्म केले व तेच अशाप्रकारे गादीवर आले. शंकरप्रभू मला पितृतुल्य होते. त्यामुळे आम्ही पुढे झालो नाही. नंतर सरकारात कळवण्यास मला सांगितले व मीच सरकारात कळविले. त्या वेळी यशवंतरावांच्या शिष्य संप्रदायाला यशवंतराव गादीवर यावेत असे वाटत असेल पण आम्हा दोघांनाही त्याचा मोह नव्हता व आम्ही दोघेही तटस्थ राहिलो. शंकरप्रभूंनी मला संस्थानचा कारभार सांभाळण्याचा सल्ला दिला व मी तेव्हापासून संस्थानचा कारभार सांभाळला.

प्रश्न : हैदराबादच्या साहित्यिक जगतात यशवंतरावाचे स्थान कसे होते ?

उत्तर: चांगलेच मानाचे स्थान होते. ते अनेक ठिकाणी सभेत अध्यक्ष असत, प्रवचने भरपूर होत. कविता वाचनही होत असे. तसेच जाहीर व्याख्यानेही होत होती. उस्मानिया विद्यापीठातही त्यांचे जाहीर व्याख्यान झालेले होते. तसेच नाशिक, मुंबई, पुणे येथे ही त्यांची व्याख्याने गाजली. पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेतही त्यांची व्याख्याने झाली. पेटी वादनाचेही जाहीर कार्यक्रम झाले. त्यांना अनेक पदव्या मिळाल्या व मानपत्रेही मिळाली.

प्रश्न : कोरेकलांच्या अभ्यासाचे स्वरूप कशा प्रकारचे होते ? व कविता लेखन कोणाच्या सांगण्यावरून करीत असत काय ?

उत्तर : ते अभ्यास नियमित करीत असत. त्यांच्या वाचण्यात विविधता होती. कोणतेही पुस्तक वाचले की ते महत्वाच्या नोंदी करीत.

अध्यात्माबरोबरच आधुनिक पुस्तक सर्व विषयावरील वाचत असत. इंग्रजी पुस्तकही वाचत असत. कविता वाचून दाखवीत नसत. एखाद्या वेळी शिष्यांनी आग्रह केल्यावरून कविता करीत. त्यांचे दुसरे कवितेचे पुस्तक " पुष्पपाकळ्या" हे वृत्तबद्ध ( एकाक्षरी पासून अनेकाक्षरी पर्यंत) काव्य आहे. हे माझ्या सांगण्यावरून त्यांनी लिहिले व मीच आमचे प्रोफेसर रेड्डी शास्त्री यांच्याकडून प्रस्तावना लिहून घेतली.

प्रश्न : नोकरीतून निवृत्त झाल्यानंतर उत्पन्नाचे साधन काय होते ?

उत्तर: फक्त पेन्शन, दुसरे काहीही नव्हते. कधी अवशकता पडलीच तर ते फक्त माणिकनगर संस्थानकडून घेत. इतरांकडून घेत नसत.

प्रश्न : यशवंतरावांना व्यसन असे काही होते काय ?

उत्तर: चहा आणि सिगरेटचे व्यसन होते. चहा भरपूर घेत.

प्रश्न : शेवटच्या आजाराचे स्वरूप काय होते ?

उत्तर : तसे काही गंभीर नव्हते. साधारणच होते.

प्रश्न : त्यांच्या नंतर त्यांचे नातेवाईक काही हयात आहेत काय ?

उत्तर : फक्त त्यांचा नातू, मुलीचा मुलगा, हरिओम् तेवढा आहे.

प्रश्न : यशवंतरावानंतर त्यांनी जमवलेल्या ग्रंथाचे काय झाले ?

उत्तर : हैदराबादेस त्यांचे अनेक शिष्य होते. त्यामुळे त्यांच्या नंतर त्यांचा ग्रंथसंग्रह कोठे गेला व काय झाले हे सांगता येत नाही. कारण मी ही त्यावेळी संस्थानच्या कारभारात गुंतलो होतो.

## कोरेकलांचे प्रकाशित ग्रंथ सूची :

### मराठी :

१. काव्यकुसुम-कलिका; प्रथम उद्भव, प्रकाशक देशपांडे अप्पासाहेब, होमिनाबाद, १९३२, पृ. सं. १८२.

२. पुष्पपाकळ्या, द्वितीय उद्भव, एस. के. दिक्षित, माणिकनगर, १९३४ पृ. सं. ३३६.

३. सुमन-सौरभ, तृतीय उद्भव, प्रकाशक. देशपांडे अप्पासाहेब, माणिकनगर, १९३६ पृ. सं. ३३०.

४. विचारवैभव (गद्यग्रंथ). प्रकाशक : अप्पासाहेब देशपांडे माणिकनगर, १९३८, पृ. सं. ३१९.

५. कौस्तुभ-किरण लघुकथा व निबंध संग्रह, प्रकाशक. अप्पासाहेब देशपांडे माणिकनगर, १९३९, पृ. सं. २००.

६. यशोविलास, प्रकाशक, अप्पासाहेब देशपांडे , माणिकनगर, १९३९, पृ. सं. १९०.

### हिन्दी :

७. यशोबिम्ब, प्रकाशक अप्पासाहेब देशपांडे , माणिकनगर, १९४१, पृ. सं. १६०.

८. सुधांशु, प्रकाशकन अप्पासाहेब देशपांडे , माणिगकनगर, १९४५, पृ. सं. ३५९.

उर्दू :

''सोजोसाज'' उर्फ कलामे नुसरत (दीवान) प्रकाशक अप्पासाहेब देशपांडे, माणिकनगर, पृ.सं. १६०.

कोरेकलांचे अप्रकाशित ग्रंथ :

१. काव्य कुसुम -कलिका, चतुर्थोद्भव, पृ. सं. सुमारे ३००.

२. विरोधाभाव (संगीत नाटक) पृ. सं. १५०.

३. मराठी-उर्दू-कोश पृ. सं. सुमारे ५००.

४. काव्य किसलय (च.) पृ. सं. ५००.

५. मक्सदे हयात उर्फ इश्तियाक् तआलीम,(संगीत नाटक)उर्दू पृ. सं. सुमारे २००.

६. आफ्ताबे इरफान ( सुधांशू हिन्दी ग्रंथ का रूपांतर) उर्दू, पृ. सं. सुमारे ३००.

७. करिश्मै इश्क ( संगीत नाटक) उर्दू पृ. सं. १२५.

श्री

# मानपत्र

सकलकलाकोविद, वृत्तसम्राट, काव्यकौस्तुभ कवि **श्री. यशवंतरावजी कोरेकल** यांस प्रेमादरपूर्वक समर्पण.

श्रेष्ठ नागरिक व चेतोहर वाङ्मयसेवक या दृष्टीनें आपण आमचे हृदय आकर्षिलें आहे. आपण श्रेष्ठप्रतीचे कवि आहां. आपलें व इतर कवींचे काव्य तौलनिकरीतीनें पाहिल्यास आपल्या काव्यप्रसूतींत एक महत्वाचा विशेष आढळतो. आपली काव्यगंगा वेदान्तसौरभमिश्रित आहे हाच तो विशेष होय, व ती अस्खलित व अव्याहत वाहत असल्यामुळें प्रेमी सुजनांना त्यांत अवगाहन करून पवित्र आनंद व शांतीचा अहर्निश उपभोग घ्यावासा वाटतो.

दुसरें सर्व वृत्तांतून महाराष्ट्र भाषेंत एकाच कवीनें सुयशपूर्वक कविता केलेला कवि आढळणेंच दुर्मिळ, आपल्या प्रतिभेनें आपण हें महत्तमकार्य सहजपणें तडीस नेलें आहे, म्हणून आपणांस 'वृत्तसम्राट' म्हणण्यास आम्हांस मुळींच प्रत्यवाय वाटत नाहीं.

उपरिनिर्दिष्ट 'सकलकलाकोविद' हें विशेषण आपणांस पूर्णपणें लागू पडते, कारण आपलें बहुतेक सर्वकलामध्यें प्राविण्य दिसून येतें. उदाहरणार्थ - संगीतशास्त्र, गायन, वादन, चित्रकला, आदि ललितकलांतील अनुपम प्राविण्य तसेंच सूक्ष्मलेखन व कातरकाम यांतील अतुल कौशल्य नित्तांत प्रशंसनीय आहे. ही प्रेमपुष्पमाला आदरपूर्वक आपणांस आम्हीं अर्पण करीत आहों. याचा स्वीकार करून उपकृत करावें ही विनंति.

जी. बी. जोशी बी. ए. एल. एल. बी., एम्. एच्. मिश्र बी. ए. ए. एल्. बी., जी. बी. हरवाळकर बी. ए. एल्. एल्. बी., शेषराव पिलखाने बी. ए. असिस्टंट रेव्हेन्यू सेक्रेटरी, त्रिंबकराव कामाठी बी. ए. एस्. ए. एस., व्ही. बी. धनाश्री बी. ए. एस्. ए. एस्. चीफसुपरेन्टेन्डेट फायनान्शियल ऑफिस., एम्. आर. परळीकर बी. ए., आर. जी. जोशी एल्. एम्. ॲन्ड एस., एन. वाय. बक्षी. बी. ए. एल्. एल्. बी.

नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥

खडाष्टक मंडळ
स्थापना १९३२

# मानपत्र

सुलतान बाजार,
हैदराबाद (दक्षिण)
गुरुवार १७-१२-३६

श्रीयुत महाराज राजमान्य राजश्री
काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद् यशवंतरावजी कोरेकल शहाअलीबंडा हैदराबाद (दक्षिण) यांसः- सादर सप्रेम साष्टांग नमस्कार वि. वि.

आपल्या अंगच्या विविध गुण समुच्चयामुळें काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद् इत्यादि महत्वसूचक पदव्या जनताजनार्दनानें स्वेच्छेनें व आनंदानें आपणांस अर्पण केल्या आहेत, परंतु आमच्या मंडळास मात्र अद्याप पावेंतों अशा तऱ्हेचा मान मिळवितां आला नव्हता. आपल्या व्यक्तित्वाचें यथार्थरीत्या चित्रण करणाऱ्या निरनिराळ्या गुणांच्या ज्या रेषा आहेत त्यामध्यें वेदान्तरहस्याचें पूर्ण प्रत्यंतर ही जी प्रधान रेषा आहे तिचा कोणत्याही पदवीनें बोध होत नाहीं म्हणून आम्ही आपणांस आदरातिशयानें व प्रेमानें "रहस्यज्ञ" अशी पदवी अर्पण करितों व अशी विनम्र प्रार्थना करितों की, आमच्या प्रेमांचे प्रतीक म्हणून ही पदवी आपल्या पूज्य नावांसन्निध निर्दिष्टिली जावी. कळावे.

भवदीय विनम्र-

प्रतिनिधी
खडाष्टक मंडळ

र. मु. जोशी
वि. कृ. भावे.

# अभिप्राय

## श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर

लेजिस्लेटिव्ह असेंब्ली पुणें, १७-४-१९२८.

रा. यशवंतराव कोरेकल यांची कविता चित्रमयजगत्, मनोरंजन, अरुणोदयमाला वगैरेंमधून प्रसिद्ध झालेली मराठी वाचकांच्या पाहण्यांत आहेच. त्याखेरीज त्यांचा अप्रकाशित कवितासंग्रह माझ्या पहाण्यात आला. त्यावरून रा. यशवंतराव यांच्या प्रासादिक, यमक प्रचुर व प्रौढ कवितेविषयी माझा अभिप्राय कायम झाला. त्यांचा ओढा वेदान्ताकडे असूनही देशभक्तीची भावना त्यांच्या अतं:करणांत असल्यामुळें त्यांचे काव्य अनेक ठिकाणी हृदयंगम व सूचक असें झालें आहे. हा संग्रह त्यांनी छापण्यास घेतला आहे व तो लोकांपुढे येईल तेव्हा आधुनिक चांगल्यापैकीं काव्यांत त्याची गणना होईल असें मला वाटतें.

(सही) **न. चिं. केळकर**

॥ श्री जय हिंद ॥

काव्यकुसुमकलिकाकार काव्यकौस्तुभ **श्री. य. स. कोरेकल** यांचे चरणी -

गुरुवर्य ! आम्हांस - आपल्या ठिकाणचें प्रेम व आदर व्यक्त करण्यास इतका आनंद वाटत आहे की, त्या योगे शब्द सापडत नाहीत. आपल्या विषयी जेव्हा जेव्हा विचार करू लागावे तेव्हा तेव्हा आपल्याविषयीचा आदर, प्रेमभाव वाढतच जातो " आपण काय आहा?" असा प्रश्न जर मनास विचारला तर मनाकडून उलट प्रश्न विचारला जातो की ' आपण काय नाही?'

एक उत्तग कवि या दृष्टिने आपणासंबंधी विचार करूं लागावें तो आदि कवि मुकुंदरायापासून अगदी अलिकडील यशवन्तादि कवि पर्यंतच्या प्रत्येक कवीतील गुणच तेवढे आपल्या काव्यात दृष्टोत्पत्तीस येतात. त्यामुळें मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर, रघुनाथपंडित, केशवसुत, गडकरी, रेंदाळकर यापैकी कोणत्या कवीशी आपली तुलना करावी हे कोडे अद्याप आम्हास उलगडले नाही. कारण आपण नुसते 'कविसम्राट' नसून 'वृत्तसम्राट' आहा हे विशेष होय.

काव्यासंबंधीची गोष्ट क्षणभर विचाराआड केली तरी आपल्या इतर गुणांसंबंधीही आमच्या मनाची तीच स्थिती होते. अर्वाचीन नामांकित वादनपटु, प्रसिद्ध कारागीर, कुशल कातरकाम करणारे, विद्वान प्रवचनकारही आपल्याशी तुलना करण्यास आम्हांस कमी वाटतात.

आमचें आपल्या ठिकाणी निस्सीम प्रेम आहे म्हणून असे विचार आमच्या मनांत येतात असे नसून ही वस्तुस्थिति आहे असं व्यक्त करण्यास आम्हास कोणताही प्रत्यवाय वाटत नाही.

सारांश आम्हांस आपल्याविषयी जे काय वाटते ते इंग्लिश कवि श्री. **वर्डस्वर्थच्या शब्दांत व्यक्त करून आपल्या यशोविकासाबद्दल प्रभूची प्रार्थना करीत रजा घेतो.**

If thou indeed derive thy light from heaven Then, to the measure of that heaven born light, Shine poet.........

॥ ॐ तत्सत् ॥

**आपले**

**शंकरराव सदावर्ते बी. ए. एल. बी.**

एन. बक्षी. बी. ए. एल्. एल्. बी.

श्री. कृ. पांडवप्रभृति ॲडमायर्स व अप्रिशिअेटर्स

शाली. हैद्रा. (द.)

ता. २१-१२-१८२९ इ.

० श्री दत्तात्रेय ०

श्री यशवंतराव कोरेकल यांनी पेन्सिलीने काढलेली एक कलाकृती

श्री यशवंतराव कोरेकल यांच्या हस्तलिखिताचा एक नमुना

श्री सद्गुरु माऊली समर्थ प्रसन्न -

पुणें - सदाशिव
फा. कृ ५ श. १८४९
११ - ३ - २८

# स्वागत

वृत्त - स्वागता

॥ स्वागता करित आज उषा ही ॥
॥ या दिशा उजळवी बघ दाही ॥
॥ सांगते जणुं असे जगताला ॥
॥ हा अताच नववत्सर आला ॥ १ ॥

॥ स्वागतार्थ जणुं मेदिनि आली ॥
॥ भूषणें कितिक हर्षुनि घाली ॥
॥ नेसुनी वसन दिव्य निघाली ॥
॥ कंचुकी हरित त्यावरि ल्याली ॥ २ ॥

॥ कुंकुमाक्त टिकली नव भाली ॥
॥ आलें गालिं मधुरास्मित लाली ॥
॥ शालु कीं फडकवी जरतारी ॥
॥ घाइ आजचि निराळिच सारी ॥ ३ ॥

॥ आगमास नव दाखवितानां ॥
॥ कोकिला मधुर ऐकवि ताना ॥
॥ कां कवीस हि सुचे कविता ना ॥
॥ सृष्टि कीं म्हणत ऐकवि ताना ॥ ४ ॥

॥ केविं ठेविल अशा समयाला ॥
॥ स्फूर्तिहीन दगडासम याला ॥
॥ कीं निसर्ग मधुहास्यमुखानें ॥
॥ तोषवी पिक हि मंजुलगानें ॥ ५ ॥

• श्री यशवंतराव कोरेकर यांच्या कातरकामाचा एक नमूना •